छत्रपती शंभूराजे कृत

# नायिकाभेद, नखशिख व सातशतक

एक सिंहावलोकन

संपादक व अनुवादक

डॉ. प्रभाकर आ. ताकवले





# जिजाऊ वंदना

जिजा माउली गे, तुला वंदना ही ।
तुझ्या प्रेरणेने, दिशा मुक्त दाही ।।१।।

भयातून मुक्ती, मिळाली जनांना ।
गुलामी कुणाला, कुणाचीच नाही ।।२।।
नसे दुःख कोणा, नसे न्यून कोणा ।
फुलांना मुलांना, नसे दैन्य काही ।।३।।
जिजा माउली गे...

जशी पार्वती ती, प्रिया शंकरास ।
तशी प्रेरिका गे, शहाजींस तूही ।।४।।
जसा संविभागी, बळी पूर्वकाळीं ।
शिवाजी जनांच्या, तसे चित्तदेहीं ।।५।।
जिजा माउली गे...

तुझ्या संस्कृतीने, तुझ्या जागृतीने ।
प्रकाशात न्हाती, मने ही प्रवाही ।।६।।
तुला वंदिताना, सुखी अंग अंग ।
खरा धर्म आता, शिवाचाच पाही ।।७।।
खरा धर्म आता, शिवाचाच पाही...
जिजा माउली गे...

## छत्रपती शिवशंभूंचे पश्चिम समुद्रास पालाण- अपवाद+ मुजोर पाणकोट मुरुड जंजिरा

शिवरायांनी दोनदा एल्गार केलेला हा जलदुर्ग! दीड तपावर झटापट करूनही तो शिवरायांचे ताब्यात आला नाही. घरात जसा उंदीर तसा महाराजांचे राज्यास सिद्दी हे या दुर्गाच्या मालकाबद्दल सभासद बखरीत वर्णन आहे. कासोटा ऊर्फ पद्मदुर्ग हा जंजिऱ्याच्या सिद्दीस पायबंद घालण्यासाठी शिवरायांनी बांधला. दर्यादिल सोनकोळी लायपाटील, दर्यासारंग मायनाक भंडारी व दौलतखान हे शिवाजींची मातब्बर माणसेही येथून माघारी फिरली. काठावरचे स्वार, कोळी, आगरी, भंडारी थकले. लायपाटलाने एका अंधारी रात्री तटास शिड्या लावल्या, पण मोरोपंत पेशवे वेळेस पोहोचले नाहीत.महाराजांनी पेशवे यांसी बोल लाविला, 'यांसी म्हणो लागले की, याही ऐसे कार्य केले असता तुम्ही कोताई(हलगर्जीपणा) केलीत, हुद्दे, रुमाल, दिवट्या, बुधल्या ऐसा सरंजाम आणून हवालदार, सरनोबत व कारकून या तिघांस तीन पालक्या हुदे सामान देऊन खुशाल केले. चौथी पालकी दिली तेही काये पो म्हणो लागले की महाराजांनी पालकी दिली ते सेवकास पावली तेव्हा महाराज खुशाल होऊन छत्री व निशाण दिले व पेशेव यांस आज्ञा केली की गलबत बांधोन त्या गलबतास नाव पालकी देऊन लाये पो. यांचे स्वाधीन करणे '(संदर्भ- शिवचरित्राचे पैलू- म. म. दत्तो वामन पोतदार)



छत्रपती शंभूराजे कृत

# नायिकाभेद, नखशिख व सातशतक

## एक सिंहावलोकन

संपादक व अनुवादक

डॉ. प्रभाकर आ. ताकवले



## दोन छत्रपतींना नीट समजावून घ्या..

*शिवछत्रपती व संभाजी छत्रपती या दोन राजांमधील व्यक्तिमत्त्वाचा फरक आपण समजून घेतला पाहिजे. शिवाजी महाराजांच्या जीवनामध्ये 'विलासा'ला स्थान नाही. संभाजी महाराजांच्या जीवनामध्ये विलासाला स्थान आहे. शिवाजी महाराजांच्या व्यक्तिमत्त्वात ''शृंगार'' रसाचा वापर कुठे दिसत नाही. संभाजीराजे शृंगार-शास्त्राची चिकित्सा करणारा नायिका-भेद, नखशिख असे ग्रंथ रचून स्त्री सौंदर्याचे रसग्रहण करणारा कवी मनाचा रसिक राजा आहे. पण म्हणून संभाजीराजांच्या जीवनातील या विलासाचा अथवा शृंगाराचा एवढा बाऊ करण्याचे कारण नाही. उलट पराक्रमी व्यक्तीच्या जीवनातील शृंगार हे दूषण न ठरता भूषण ठरते, असा एक वेगळा दृष्टिकोन डॉ. कृष्ण दिवाकरांनी आपल्या लेखात मांडलेला दिसेल. वास्तविक, मध्ययुगीन राजेरजवाड्यांच्या विलासाच्या इतिहासाच्या पार्श्वभूमीवर संभाजीराजांचे हे तथाकथित विलासी जीवन हा चर्चा करण्याचाही विषय होऊ शकत नाही. तो होतो याचे कारण शिवछत्रपतींची मऱ्हाटमोळी स्पार्टन साधेपणाची कारकीर्द त्यांना निकटची पार्श्वभूमी म्हणून लाभली म्हणूनच (डॉ. जयसिंगराव पवार-छत्रपती संभाजी (स्मारक ग्रंथ) मधील प्रस्तावनेतून)* सुजाण महाराष्ट्रीय वाचकवृंद व सहृदय महाराष्ट्रीयाचे मत, छ. संभाजीराजांच्या या तीन हिंदी ग्रंथपुष्पांजलीच्या अनुवादनापूर्वी ध्यानात घेतील अशी आशा आहे. तरीही पाठकांनी आपली मते मला निर्भयपणे कळवावीत. पुढील आवृत्तीत गंभीरपणे, मनोभावे त्यांची दखल घेतली जाईल.

– संपादक व अनुवादक

# प्रस्तावना

सूर्याला ग्रहण लागते तसेच मोठे ढग कधी सूर्याच्या आड येतात. अशावेळी सूर्यप्रकाश प्रखर नसतो. काही वेळाने अडथळे बाजूला होतात. सूर्यप्रकाश पूर्ववत् होतो. ही एक नैसर्गिक प्रक्रिया आहे. काही लोक जाणीवपूर्वक सूर्याआड आपले हात धरून सूर्य झाकण्याचा केविलवाणा प्रयत्न करून, इतरांची मुद्दाम दिशाभूल करतात. ही विकृती आहे. शिवकुळाच्या ऐतिहासिक कार्याबाबत नेमके असेच घडत आहे. अज्ञानी व प्रामाणिक शिववंशाच्या नैसर्गिक बेफिकिरीमुळे त्यांचा अभिमानास्पद इतिहास जगासमोर आला नाही; पण त्याचवेळी काही विकृत मनोवृत्तीच्या लोकांनी तो जगासमोर येऊच नये यासाठी तो झाकण्याचा टोकाचा षंढपणा केला. छत्रपती संभाजी महाराज या शिवपुत्राबाबत ही विकृत मानसिकता आजही कार्यरत आहे. छत्रपती संभाजी महाराजांचे विविध भाषीय साहित्य सुमारे तीनशे वर्षे दाबून ठेवण्यात आले होते. डॉ. प्रभाकर ताकवले सरांनी म्हातारपणात अतोनात श्रम घेतले नि शंभूराजांचे प्रमुख साहित्य शंभूप्रेमींसमोर सादर केले आहे. सुमारे वर्षभरापूर्वीच ॲड. शैलजा मोळक व ज्ञानेश्वर मोळक या दाम्पत्याने छत्रपती संभाजी महाराज रचित संस्कृत ग्रंथ 'बुधभूषणा'चे मराठी भाषांतर आम्हा शंभूप्रेमींना दिले आहे. प्राचार्य डॉ. प्रभाकर ताकवले सरांनी सर्व प्रभा व कर पणाला लावून ताक व वलय अलग अलग केले. नायिकाभेद, नखशिख व सातशतक हे छत्रपती संभाजी महाराजरचित हिंदीब्रजभाषी ग्रंथ विस्कळीत भागामध्ये मिळाले. प्राचार्य डॉ. प्रभाकर ताकवले तेवढेच भाग एकत्रित करून पुढचे व मागचे थोडे तर्क करून भाषांतरित हा ग्रंथ आपल्यासमोर सादर करत आहे. छत्रपती संभाजी महाराजांचे हे ऐतिहासिक लिखाण एवढी वर्षे लपवता आले; पण प्रयत्न करूनही ते संपवता आले नाही. कारण ते सूर्यप्रकाशाएवढेच स्वयंप्रकाशित व प्रखर आहे. प्राचार्य ताकवले सरांचे आभार मानून मी या तीनही भाषांतरित ग्रंथांबद्दल थोडे मनोगत मांडत आहे. कृपया कुणाला इतर भाग मिळाल्यास संपर्क करावा.

लोकजीवनाचा मोठा प्रभाव सिंधूजनांच्या शिवकुळातील साहित्यावर आपल्याला प्रामुख्याने दिसतो. लोकजीवन सुखमयी, आनंदमयी व एकमयी होण्यासाठी लोकभाषा, लोकसंगीत, लोककला, लोकसाहित्य, लोकगीते, लोकराज्य, लोकराजा अशा विविध संकल्पना शिवकुळात उदयास आल्या.

उत्तर भारतातील लोकजीवनावर पुढेपुढे गोकुळीचा राणा म्हणून श्रीकृष्णाचा मोठा प्रभाव पडलेला दिसतो. श्रीकृष्ण व गवळणी, श्रीकृष्ण व राधा, श्रीकृष्ण व विविध शृंगारिकलीला अशा पद्धतीचा प्रभाव सुमारे अकराव्या शतकाच्या आसपास उत्तर भारतातील समाज जीवनावर आढळतो. त्यातच उत्तर भारतातील हिंदीमिश्रित ब्रजभाषा ही जवळपास श्रीकृष्णबोलीसारखीच स्वीकारली गेली. त्यातून यमुनेच्या उत्तरेला व प्रामुख्याने मथुरेपासून अलाहाबाद-वाराणसी बिहारपर्यंत ह्या श्रीकृष्ण-राधा भक्तिसंगीताचा प्रसार झाला. भक्ती शुद्ध असते. त्यातील भाव स्पष्ट असतो. तो व्यक्त होणारी भावना शब्दांकित करताना लोकजीवनाचे स्त्री-पुरुष हे घटक त्याकाळी अग्रभागी होते. त्यामुळे शृंगारिक काव्य ही आपली आजची कल्पना अशा भक्तिकाव्यास लागू होत नाही. सध्याच्या लोकजीवनात शृंगार या शब्दाची जागा अश्लीलतेने घेतली म्हटले तरी चालेल. छत्रपती संभाजी महाराज आग्र्यास गेले तेव्हा ते नऊ वर्षांचे होते. त्यांना संस्कृत, फारसी, हिंदी, मराठी अशा अनेक भाषा ज्ञात होत्याच. उपलब्ध इतिहासाचा आधार घेतल्यास बाळ शंभूराजेंचा आग्रा-मथुरा-वाराणसी-अलाहाबाद अशा गंगा-यमुनेच्या परिसरात सुमारे दोन वर्षे वावर होता. त्याचवेळी त्यांना कनोजी ब्राह्मण असलेल्या कवी कलश या हरहुन्नरी ब्रजभाषी कवी भेटले. शंभूराजांचा पिंड अत्यंत बुद्धिमान असा होताच, पण या सर्वच गदारोळांत त्यांनी भाषा व साहित्यासोबतच लोकसंगीताचा छंद जोपासल्याचे दिसते. यातूनच त्या कोवळ्या वयात शंभूराजांना मथुरेच्या-वृंदावनाच्या, गोपाळाच्या, गवळणींच्या, भक्तांच्या सहवासातून श्रीकृष्ण-राधा भक्तिगीते पाठ झाली असावीत. त्याकाळी गावोगाव सायंकाळी सर्वच लहानथोर-स्त्री वा पुरुष असा भेदभाव न करता भक्तिरसाचा आनंद उपभोगत असत. श्रीकृष्ण व राधा हे ब्रजभाषी जनतेचे आराध्यदैवत आहे. त्याचा प्रसार आपल्याला नर्मदेपर्यंत पसरल्याचे दिसते. ज्याला नृत्य करता येत नाही, तो वाया गेला असे समजत असत. यामुळे राजा ते रंक याच नादात असत. रास-गरबा हा याचाच एक भाग. श्रीकृष्णाच्या व गौरांगप्रभूच्या प्रेमाने सारा उत्तर भारत आनंद सागरात डुबत असतो. शंभूराजांच्या बालमनावर हे लोकजीवन बिंबवल्या गेले. महाराष्ट्रात वारकरी धर्मपरंपराचा विकास झाला. या वारकरी धर्माने पंढरीचा विठ्ठल हे श्रीकृष्णप्रतिरूप स्वीकारले. वारकरी धर्माचा मूळचा उद्देश हा सामाजिक व सांस्कृतिक परिवर्तनाचाच होता. त्यामुळे वारकरी धर्म भक्तिसंगीतात शृंगार आढळत नाही. असे असले तरी महाराष्ट्राच्या दक्षिणेला कृष्णेच्या खाली

आपल्याला तेथील मंदिरात विशेषत: शिवमंदिरात शिवकुळातील लोकजीवनाची परंपरांची रेलचेल झाल्याचे जाणवते. तेथील मंदिरामध्ये शिवाची आराधना करण्यासाठी विशेष शृंगार करून नखशिखांत नटून-थटून भक्तीनृत्याचा अवलंब केला जायचा. या नृत्यांगणांना राजमान्यता होती, समाजमान्यता होती. त्यांना नायिका या नावाने संबोधले जायचे. लय, ताल, सूर याचा उत्तम असा भावसंगम साधून या नायिका शिवासमोर शेकडो भावमुद्रांच्या माध्यमातून नृत्य सादर करायच्या. छत्रपती संभाजी महाराज महाराष्ट्रात परत आल्यावर त्यांनी सर्व जबाबदाऱ्या सांभाळून हा नृत्यसंगीताचा छंद जोपासल्याचे दिसते. थोडक्यात, शंभूराजांच्या साहित्यावर उत्तर भारतीय व्रजभाषी व श्रीकृष्ण-राधा लीलांच्या शृंगारिक भक्तिरसाने ओतप्रीत भरलेल्या लोकजीवनाचा, महाराष्ट्रातील वारकरी धर्म चळवळीतींल भक्तीपूर्ण श्री विठ्ठलास अर्पित भावरसयुक्त भक्तिसंगीताचा व वारकरी जीवनाचा तसेच सिंधूसंस्कृतीतील शिवकुळातील ब्रहदेश्वर वा तत्सम शिवमंदिरात होणाऱ्या भक्तीनृत्यांतील नर्तकींच्या शृंगारिक लावण्याचा व विविध भावमुद्रांना स्वरबद्ध करणाऱ्या भावसंगीताचा, लोकगीतांचा असा संमिश्र प्रभाव आपल्याला दिसतो. महाराष्ट्रासह नर्मदेपासून दक्षिणेत तंजावरपर्यंत या कलांना मराठा राजांनी सतत राजाश्रय दिला आहे. स्वत: शहाजीराजेंच्या काळात या लोककलांना उत्तेजन दिले जायचे. छत्रपती शिवाजी महाराजांचा काळ हा थोडा दगदगीचा होता. वयाच्या सातव्या वर्षीच शिवाजीराजांवर मराठ्यांच्या स्वराज्याचा संसार उभारण्याची व सांभाळण्याची जबाबदारी येऊन पडली. ती शेवटपर्यंत कमी झाली नाही. कदाचित यामुळे महाराजांना स्वत:तील साहित्यिक फुलवायला अवधी मिळाला नसावा. इत:पर छत्रपती शिवाजी महाराजही नामवंत कवी होते. त्यांचे फारसी व मराठीतील काव्य परदेशातील काही देशामध्ये जतन केल्याचे बोलले जाते. त्यामुळेच त्यांनी सन १६७१ मध्ये २६ जानेवारीस शंभूराजांना स्वतंत्र राज्यकारभार सोपवतानाच विविध भाषापंडित त्यांच्या सेवेस दिले होते. तसेच रायगडावर राजधानी करण्याचे ठरताच मराठी भाषा शुद्ध भाषा शब्दकोश तयार करायला घेतला. पोर्तुगीजांकडे महाराजांनी छपाईयंत्राची मागणी करून ऑर्डरही दिली होती. पण ते पोहोचले नाही. थोडक्यात, शंभूराजांची रसिकता व साहित्यछंद महाराजांना माहीत होते व ते जतन व्हावेत यासाठी त्यांना सतत प्रोत्साहन दिले आहे. दक्षिण भारतात मराठ्यांनी संगीत, कला, साहित्य, लोकजीवन इत्यादी क्षेत्रांत अगदी बाराव्या शतकापासून भरीव कामगिरी केलेली आहेच. पण मनराव्या शतकापासून

शहाजीराजे यांनी बीजारोपण केलेल्या या कार्याचा वटवृक्ष केवळ अठराव्या-एकोणीसाव्या शतकातच तंजावर मराठा संस्थानच्या रूपाने जगासमोर आला आहे. महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाने सन १९८२ मध्ये तंजावर नृत्य प्रबंध प्रकाशित केला आहे. या प्रबंधातील भोसल्यांची साहित्यिक परंपरा हा लेख याच पुस्तकात मुद्दाम परिशिष्ट म्हणून समाविष्ट केला आहे. ज्यांना शक्य असेल त्यांनी शासकीय ग्रंथालयातून हा प्रबंध उपलब्ध असल्यास विकत घ्यावा. मराठ्यांनी विकसित केलेल्या अनेक नृत्यलिपींचा परिचय वाचकांना होऊ शकतो.

### नायिकाभेद :

छत्रपती संभाजी महाराजांनी नायिकाभेद हा ग्रंथ शृंगाररसप्रधान काव्यात रचलेला असून भारतीय समाजमनावर आजही अधिराज्य गाजवणाऱ्या राधा-कृष्ण या प्रेमजीवांच्या विविध भावमुद्रावर तो आधारित आहे. आजही एकही हिंदी वा मराठी सिनेमा श्रीकृष्ण-राधा यांचा उल्लेखाशिवाय पूर्ण होत नाही. श्रीकृष्णाची मुरली म्हणजेच नादमधुर असे जनसामान्यांना मोहक वाटणारे सूर. वरील विवेचनात नायिका व भेद या दोन शब्दांवर धावते विवेचन आलेलेच आहे. नायिका म्हणजे आज कथा, कादंबऱ्या, चित्रपटात असतात तसाच हिरॉईन समजायला हरकत नाही. भेद म्हणजे संबंधित नायिक जेव्हा एखाद्या विशिष्ट पद्धतीने नृत्य सादर करते. त्यासाठी अंग, प्रत्यंग, उपांग इत्यादींचा शास्त्रशुद्ध वापर होय. रस, भाव व भेद असे विविधांग या नृत्याचा प्राण आहेत. शिरोभेद, ग्रीव, भेद, दृष्टीभेद, मंडलभेद, पादभेद, स्थानक भेद, रसभेद असे अनेक प्रकार आहेत. या सर्व नायिकेचे (नर्तकीचे) भाव व्यक्त करणाऱ्या मुद्रा आहे. उदा. आनंदमुद्रा, स्वागतमुद्रा, विरहमुद्रा इत्यादी. लग्न झालेल्या पुरुषांना आपली बायको प्रेमात, रागात, आनंदात, विरहात, सुखात, दुःखात कशी वागते हे पाहता आल्यास व त्यातील फरक समजल्यास भेद ओळखणे सोपे आहे. त्यामुळेच नायिकांचेही भेद म्हणजे प्रकार केले आहेत. वर्णानुसार, प्रकृतीनुसार, स्वभावानुसार, धर्मानुसार, दशानुसार, अवस्थानुसार, नायिकांचे अनेक भेद करता येतात. त्याच भेदानुसार त्या त्या नायिकेचा अभिनय वेगळा होतो. शब्द, स्पर्श, रूप, गंध व मन यांची एकाग्रता म्हणजेच अभिनय. केवळ पंचेद्रिये एकरूप होऊन अभिनय साधत नाही. तर मनोनिग्रहही आवश्यक आहेच. मूलतः अभियनयातून व्यक्ती ओळख न होता भूमिकेचीच ओळख होणे शास्त्रसंमत आहे.

वाचकांना केवळ वाचतानाच परिचित शब्द असूनही पूर्ण अपरिचित वाटणारा हा विषय बाळ शंभूराजांनी वयाच्या सतराव्या वर्षी शब्दबद्ध केला आहे. लय, ताल, सूर, राग, संगीत, नृत्य, वाद्य, इत्यादी विविध नावे आपल्याला ऐकून माहीत आहेत. संगीत हा शब्द गीत, वाद्य व नृत्य या सामूहिक अर्थाचा आहे. नृत्य हे वाद्यावर चालते आणि वाद्य गीतावर चालते. चाल म्हणजेच गीत हे प्रमुख अंग आहे. संभाजी महाराजांचे नायिकाभेद हे अशा प्रकारच्या गीतांचे भांडारच आहे. यावरून शंभूराजांच्या या क्षेत्रातील प्रभुत्वाची आपण कल्पना करू शकतो.

प्राचार्य डॉ. प्रभाकर ताकवले सरांना एकूण २७ पदे उपलब्ध झाली आहेत. ही पदे सलग नाहीत. तसेच भेदानुसार नाहीत. मुग्धा, मध्या व प्रौढा नायिकांवरील रचना यात आहेतच. स्विया, परकिया, गणिका, उत्तमा, मध्यमा, अधमा नायिकांनाही स्पर्श झालेला दिसतो. श्रीशिवशंकर व माता पार्वती यांच्यावरील गीतांपासून मुळात लोकसंगीतास सिंधूजनांमध्ये सुरुवात झाल्याचे दिसते. वाचकांना उपयुक्त ठरेल या विचाराने नायिकांचे भेद येथे देत आहे.

**(अ) धर्मानुसार भेद :**

१) स्विया अथवा स्वकिया : स्वत:ची पत्नी वा स्त्री

२) अन्या अथवा परकिया : दुसऱ्याची स्त्री.

दोन प्रकार १) ऊढा-लग्न झालेली २) अनुढा- लग्न न झालेली

३) साधारण, गणिका, वेश्या, पैशासाठी प्रेम करणारी

**(ब) वयोमानानुसार अथवा दशानुसार भेद :**

१) मुग्धा : जिच्या अंग-प्रत्यंगात नुकतेच यौवनाकुंर फुलू लागले आहेत व जी कामक्रीडेविषयी संपूर्णपणे अनभिज्ञ आहे.

दोन भेद : १. अज्ञात यौवना- यौवनाची जाणीव नसलेली, २. ज्ञात यौवन- यौवनाची नुकतीच जाणीव होऊ लागलेली.

२) मध्या : लज्जा व काम जिच्यात समप्रमाणात आहेत. (जिला कामक्रीडा माहीत आहे, आवड आहे; परंतु प्रचंड लाजाळू स्त्री)

३) प्रौढा : किंचित लज्जा व कामाने परिपूर्ण आणि संपूर्ण कामकलेमध्ये प्रविण असलेल्या स्त्रिया अथवा प्रगल्भा.

**(क) अवस्थानुसार भेद :**

१) वासक सज्जा : प्रियकर घरी येणार म्हणून साजशृंगार करत नटणारी व त्यातच दंग असणारी स्त्री.

२) विरहोत्कंठिता : प्रियकराच्या विरहाने व्याकुळ झालेली स्त्री.

३) स्वाधीनपतीका : पती जिच्या संपूर्ण आधीन आहे अशी स्त्री

४) कलहांतरिता : प्रथम प्रियकराशी भांडण उकरून काढणारी व तो रागावून निघून गेल्यावर भांडण मिटवण्यास उत्सुक असणारी पश्चात्तापदग्ध स्त्री.

५) खंडिता : प्रियकराच्या अंगावर रतिचिन्हे पाहून रागावणारी, दु:ख व्यक्त करणारी स्त्री.

६) विप्रलब्धा : प्रियकराने सांगितलेल्या संकेतस्थळी येऊन तो तेथे न आल्याने दु:खीत झालेली स्त्री.

७) प्रोषित पतिका : जिचा पती परदेशात गेला आहे अशी स्त्री

८) अभिसारिका : कामार्त होऊन कशाचीही लाजलज्जा न बाळगता प्रियकराला भेटण्यासाठी धावत सुटलेली स्त्री.

**(ड) वर्णानुसार भेद :**

१) दिव्या : देवांच्या (ब्राह्मणांच्या) स्त्रिया.

२) अदिव्य : मानव स्त्रिया.

३) दिव्या दिव्या : भूतलावर जन्म घेतलेल्या देव स्त्रिया. उदा. सीता

**(ई) प्रकृत्यानुसार भेद :**

१) उत्तमा : पतीच्या सुखात आपले सुख मानणारी. तो कितीही हरामखोर असला तरी न रागवता स्वत: सदाचरण करणारी.

२) मध्यमा : पतीचे दोष-गुण पाहून राग-लोभ-प्रेम व्यक्त करणारी.

३) अधमा : पती कितीही चांगला वागला तरी दुराचरण करणारी

**(फ) स्वभावानुसार भेद :**

१) अन्यसुरत दु:खिता : दुसऱ्या स्त्रीच्या अंगावर आपल्या पतीची रतिचिन्हे पाहून दु:ख करणारी स्त्री.

२) मानवती : पतीचा अपराध त्याच्या लक्षात आणून देणारी मानीपणा करणारी स्त्री.

३) गर्विता : प्रेमगर्विता : पतीच्या स्वत:वरील प्रेमाचा गर्व करणारी
रूपगर्विता : स्वत:च्या रूपाचा गर्व असणारी
गुणगर्विता : स्वत:च्या गुणाचा गर्व असणारी

या प्रमुख नायिकभेदांची माहिती ढोबळ मानाने आहे. एकाच नायिकेमध्ये वा स्त्रीमध्ये एकाचवेळी अनेक भेद असू शकतात. कालमानानुसार, परिस्थितीनुसार त्यात बदल होऊ शकतो.

**नखशिख :**

नखशिख हेही शृंगारप्रधान काव्य आहे. एखाद्या रूपगर्वितेचे नखापासून ते शिख म्हणजे शिरापर्यंत–डोक्यापर्यंत व डोक्यावरील लांबसडक केसापर्यंतचे शृंगारिक वर्णन. नायक व नायिका यांच्यामधील हे संवादरूप काव्य आहे. त्यात गेयता आहे. तसेच प्रत्येक वर्णनामध्ये रूपक अलंकाराचा पुरेपूर वापर केलेला आहे. आपण एखादे हुबेहूब वर्णन सांगतो तेव्हा नखशिखांत हा शब्दप्रयोग करत असतो. उत्तर भारतात विशेषत: लखनौ परिसरात उर्दू भाषेचा वापर वाढला होता. महफिलांचे आयोजन असायचे. काही बादशहा स्वत: नृत्यशिक्षक वा नृत्याचे विशेष चाहते होते. लेखक–कवी होते. विशेषत: बादशहा अकबराच्या काळापासून मोगलशाहीत नाचगाणे, शेरोशायरी, उर्दू–फारसी मिश्रित यांची रेलचेल होती. तसेच उर्दू भाषेवरही ब्रजभाषेचा प्रभाव होताच. शृंगाराची भाषा म्हणूनही उर्दूचा वापर होताच, पण राजाश्रयामुळे उर्दू गीतांना प्रतिष्ठा प्राप्त झाली होती. बाळ शंभूराजे आग्र्यास असताना व नंतरच्या काळात उर्दू भाषेसोबतच उर्दू साहित्याच्या संपर्कात आले असावे. उर्दू गझल, उर्दू रुबाया, उर्दू शेरोशायरी अशा काव्यगायनाचा लाभही शंभूराजांना झाला असावा. औरंगजेब बादशहाच्या दोन मुली झिनतुन्निसा व झेबुन्निसा चांगल्या साहित्यिक होत्या. बाळ शंभूराजांचा त्यांना लळा लागला होता. त्यावेळी शंभूराजांचे वय होते नऊ वर्षे तर या दोन्ही बहिणी तिशीत होत्या. शंभूराजांची बुद्धिमत्ता व विविध भाषीय साहित्यांवरील अभ्यास पाहून त्या भगिनी प्रभावित झाल्या होत्याच. यातूनच शंभूराजांनाही नखशिखासारखा काव्यसंग्रह रचण्याची इच्छा झाली. नखशिखमधील एकूण १३ पदांचा शोध प्राचार्य डॉ. प्रभाकर ताकवले सरांनी घेतला आहे. त्या पदांचा मराठीत शब्दश: अर्थही वाचकांसाठी दिला आहे.

**नायिकाभेद व नखशिख :**

छत्रपती संभाजी महाराज रचित संस्कृत ग्रंथ बुधभूषणचे संपादन व मराठी भाषांतर प्राचार्य डॉ. प्रभाकर ताकवले यांनीच केलेले आहे. या ग्रंथाची संस्कृत प्रत मा. ॲड. शैलजा मोळक यांनी उपलब्ध करून दिली होती. छत्रपती शंभूराजे रचित नायिकाभेद, नखशिख व सातशतक हे ग्रंथ कुठेच उपलब्ध होत नव्हते. वाराणसी येथील प्रचारिणी सभेत या ग्रंथांच्या हस्तलिखित प्रती उपलब्ध असल्याचे डॉ. जयसिंगराव पवार व डॉ. वसंतराव मोरे यांनी सांगितले होते. त्यावरून मा. नेताजी गोरे, अध्यक्ष मराठा सेवा संघ

यांच्या नेतृत्वाखाली सर्वश्री प्रा. प्रभाकर पावडे, प्रा. गंगाधर बनबरे, प्रा. श्रीमंत कोकाटे वाराणसीला जाऊन आले. त्यांना काही त्रोटक साहित्य मिळाले. ह्या तीनही ग्रंथांचे हस्तलिखित इटली व फ्रान्समध्ये असल्याचे बोलले जाते असो. अशा प्रकारे उपलब्ध झालेल्या छत्रपती संभाजी महाराजांच्या साहित्याचे संपादन हाती घेतले आणि प्राचार्य डॉ. प्रभाकर ताकवले सर आपले म्हातारपण विसरून तरुण झाले.

नायिकाभेद व नखशिखमधील भाव काव्याचा प्रभाव सहज दिसून येतो. यवतमाळमधील मराठी गझलांचे जनक व गझलकार सुरेश भट यांचे गुरुवर्य भाऊसाहेब पाटणकर यांच्या गझला व शेरोशायरीमधील भाव छत्रपती संभाजी महाराजांच्या या दीर्घ काव्याशी जुळतात. एवढेच नाही तर नागपूरचे सुप्रसिद्ध मराठी गझलकार शायर प्रा. ज्ञानेश वाकुडकर यांचे सखी साजणी हे मालिका काव्य नि अंगार नि शृंगार ही शेरोशायरी जणू काही नायिकाभेद व नखशिखांचे मराठी भाषांतरच आहे. मा. ज्ञानेश वाकुडकरांची सखी साजणी अनेकांनी मुखोद्‌गत् केली आहे. रुसलेल्या बायकोला (अथवा सखीला-प्रेयसीला वा कोणत्याही स्त्रीला) सखी साजणीतील योग्य वेळी, योग्य ओळी, योग्य ठिकाणी ऐकावल्यास रूसवा दूर व काम फत्ते. छत्रपती संभाजी महाराजांच्या काळी राधा-कृष्ण ही जोडी भक्ती व शृंगाररसाची प्रातिनिधिक रूपे लोकसाहित्यात व लोकजीवनात आढळतात. नायिकाभेदमधील साम्य मा. ज्ञानेश वाकुडकरांच्या काव्यात सापडते. उदा.

**पद नं.३ मुग्धा सुरतारंभ सवैया**

बहरायचे कशाला? वाकायचे कशाला?
आधी फुलायचे, मग झाकायचे कशाला?
वारा तिथे फुलांना घेरित चालला अन्
आम्ही इथे उसासे टाकायचे कशाला?(सखे साजणी)

**पद. नं.५ परकिया ऊहा :**

जरी रूसली तू तरी जीव जातो
जरी हसली तू तरी जीव जातो
असाही जीव जातो, तसा जीव जातो
कळेना मलाही कसा जीव जातो

किंवा :

माझे ओठ परेशान, तुले गाल परेशान

सारं लाजाळूचं रान, सखे झालं परेशानं!(सखे साजणी मधून)

पद. ६ पूर्वानुराग

अजून हाय आठवे जुना प्रचंड वारा
मनात हाय! साठवे जुन्याच थंड गारा
जुन्या जरी सरी तरी उरी नवीन गीते
नवा मनात मोर आजं अन् नवा पिसारा!

पद.२७ रूपगर्विता

कळी नाजूक कोवळी, झाली हळूच तरुण
ऊन पिवळे पिवळे, कुणी झाकले वरून?
ऊन पिऊन पिवळे, झाली सोनियाची काया
बंध काचोळीचे मग हळू लागले तुटाया!

पद २८ प्रौढाके सुरतांत : कवी कलश

तुझ हसणं साजणी, तन मन जागवितं
तुझ्या हसण्यात गीता, हसण्यात भागवत!
तुझं हसणं साजणी, नव्हे सोपं साधं
घासं भुकेल्याच्या तोंडी, कधी देवीचा प्रसाद!

नखशिख तर अगदी 'सखे साजणी'च समजावे. एखाद्या नायिकेचे नखापासून केसापर्यंतचे हुबेहूब शृंगारिक काव्यवर्णन म्हणजे सखे साजणी, हेच आपण नखशिख समजावे. उदाहरणार्थ :

तुझ्या पायात पैंजण, रुणझुणती साजणी
तुझ्या रुपाची आरती, जणू म्हणती साजणी!
किती घरंदाज तुझी, किती कुलीन पापणी
किती नाजूक पापणी, किती शालीन पापणी!
तुझ्या टपोर डोळ्यात, साऱ्या दुनियेचं धन
आत ठेवलेत हिरे, वर पापणी झाकण!
तुझ्या डोळ्याचं काजळ, मन जाळते साजणी
तुही कशाचा निषेध, सांग पाळते साजणी?
तुझे रूप भारी छळू लागले
जगालाही सारे हे कळू लागले
सखे नाहताना जरा काळजी घे
नळातील पाणी जळू लागले

स्त्रीच्या केसावर अनेक काव्य झालीत. तसेच तिच्या स्तनमंडलाचा वेध आजही कुणा कवीला घेता आलेला नाही. मा. भाऊसाहेब पाटणकरांनी सुंदरीच्या वेणीवरही शब्दांना मोकळे सोडले. ते म्हणतात–

पेड वेणीचे तुझ्या तूं। वक्षावरी या सोडिले ।।
जणू रक्षिण्या धन यौवनांचे। नाग तू सांभाळिले ।।

याच वेणीसाठी मा. ज्ञानेश वाकुडकरांचा जीव गुंततो. ते म्हणतात–

सखे चालतेस तेव्हा, वेणी ऐटीत हालते
खुल्या माळावर जशी, काळी नागीण डोलते!

अकबर बादशहाच्या दरबारात राजकवी आलम होता. तो नायिकेबद्दल म्हणतो–

कनक छरीसी कामिनी
काहे कटि है खिन
कटिको कांचन विधी
कुच न मध्य धर दीन ।।

ही कामिनी सुवर्ण छडीसमान आहे. पण हिचा कटिभाग क्षीण कबरे! कटिभागाचे जे सुवर्ण आहे ते विधात्याने काढून उरोजाच्या ठिकाणी धारण करावयास लावले आहे.

पुरुषांनी जसे स्त्रियावर अनेक प्रकारचे लिखाण केले आहे तेवढे स्त्रियांनाही पुरुषांसाठी केलेले नाही. प्रत्यक्षात स्त्रियांच्या तुलनेत पुरुषच जास्त सुंदर असतात. स्त्रियांनाही खऱ्या अर्थाने फक्त मर्द पुरुषच आवडतात. शौर्याच्या बाबतीत स्त्रियामध्ये अनेक चर्चा होतात. युद्धभूमीवर जर पती वा प्रियकर युद्धासाठी गेला असेल तर तो जिंकावा अथवा लढता लढता मरावा हीच इच्छा स्त्री करते. पराभूत होऊन पती जिवंत पळून परत आल्यास आपल्याला सहकारी स्त्रियांमध्ये तोंड दाखवायला जागा राहणार नाही. अशा पद्धतीचे गीत आहेत. सर्व भाषांमधून असे लिखाण उपलब्ध आहे.

**सातशतक :**

छत्रपती संभाजी महाराजांच्या साहित्यात 'सातशतक' या ग्रंथाचा समावेश आहे. ब्रजभाषी 'सात' हे मूळ 'शात'या शब्दाचे रूप आहे. असे प्राचार्य डॉ. प्रभाकर ताकवले सरांनी सुरुवातीलाच स्पष्ट केले आहे. सात म्हणजे अत्यानंद शतक म्हणजे शंभर. म्हणजेच अत्यानंद देणारे शंभरपदे छत्रपती संभाजी महाराजांनी रचलेली होती. ही पदे रचताना शंभूराजांच्या मनावर वैराग्याच्या

भावनेचा प्रभाव असण्याचे कारण नाही. शंभूराजांच्या साहित्यरचनेचा सर्वसाधारण क्रम असा आहे. बुधभूषण, नायिकाभेद, नखशिख व सातशतक. बाळशंभूराजे, युवराज शंभूराजे व छत्रपती शंभूराजे ही शंभूराजांच्या जीवनाची फोड करता येईल. सन १६६५-६६ मध्ये वयाच्या नवव्या वर्षी उत्तर भारतातील साहित्याचा अभ्यास व प्रभाव लक्षात घेतला पाहिजे. त्यावेळी भारतातील राजकीय, सांस्कृतिक, सामाजिक, धार्मिक, भावनिक जीवनाबाबतही विचार होणे गरजेचे आहे. ज्या राजकारणाचा भाग म्हणून बालवयात शंभूबाळास वडिलांच्या राजनीतीचा भाग म्हणून बादशहाकडे ओलीस राहावे लागले. पंचहजारी मनसबदार व्हावे लागले, तसेच आग्रा येथे जावे लागले. ते राजकारण प्रथम पूर्णत: अवलोकन करण्यास त्यांनी प्राधान्य दिले. त्याचवेळी उत्तर भारतावरील समाजजीवनावर असलेला गौतम बुद्धाचा प्रभावही त्यांच्या नजरेतून सुटला नसावा. दक्षिणेतील यादवांचा लज्जास्पद इतिहास त्यांना आग्र्यास येणापूर्वीच ज्ञात होता. याशिवाय महाराष्ट्रातील समाजजीवन कसे घुसळून निघाले होते, हे त्यांनी अनुभवले होतेच, वारकरी धर्माचा महाराष्ट्रात झालेला प्रचारही त्यांना माहीत होताच. वारकरी धर्म साहित्य व प्रामुख्याने संत नामदेव महाराज, संत गोरा महाराज, संत चोखोबा, संत तुकाराम महाराज यांचे अभंग गावोगाव व घरोघरी पोहोचले होतेच. गौतम बुद्धाचे तत्त्व, राज्यशास्त्र, समाजशास्त्र अभ्यासले त्याचवेळी सांस्कृतिक व धार्मिक जीवनाचाही अभ्यास केला आणि सातशतकची रचना केली. सातशतकमधील अत्यल्प पदांचा शोध लागला आहे. त्यावर प्राचार्य ताकवले सरांचे भाष्य आहेच.

'सातशतक' या रचनेकडे वाचक व अभ्यासकांनी साहित्य म्हणून पाहावे. त्याकाळी समजामध्ये लिहिल्या जाणाऱ्या विविधांगी साहित्य प्रकारांना छत्रपती संभाजी महाराजांनी स्पर्श केल्याचे दिसते. 'सातशतक'मधील रचना एका वेगळ्या भावाच्या आहेत. म्हणून शंभूराजे वैराग्याकडे झुकले होते असे म्हणता येणार नाही. भक्तिरसाला, वानप्रस्थाश्रमीच्या आयुष्याला, समाजमनाला भावणाऱ्या साहित्याची निर्मिती अनेकांनी केलेली आहेच. भृतहरीचे विरहगीत वा वैराग्यभावना यांची तुलना छत्रपती संभाजीराजांशी होऊ शकत नाही. भृतहरी सारखा प्रजाहितदक्ष राजा वैराग्याकडे वळला तो त्यांच्या कौटुंबिक कलहातून आपली महाराणी मनाने दुसऱ्याची आहे, आपण जिच्यासाठी आपला जीव ओवाळून टाकतो ती महाराणी सर्वस्वी आपली नाहीच. ही

वेदना भृतहरीला वैराग्याकडे घेऊन जाते. हा भाग सोडला तरी छत्रपती संभाजी महाराजांचा व्यासंग पाहता त्यांनी भारतीय लोकजीवनाचा हजारो वर्षांचा जैन, बुद्ध, अशोक, पृथ्वीराज चौहान, मोगलांचा इतिहास, वारकरी धर्मचळवळ, सुफीसंत चळवळ, महानुभव चक्रधरांची धर्मचळवळ, संत बसवेश्वरांची लिंगायत धर्मचळवळ, शैव व वैष्णव धर्मसंघर्ष, यादवांच्या यादवीचा इतिहास अत्यंत काळजीपूर्वक अभ्यासला असावा. लोकसाहित्यातून लोकांना मानसिक समाधान व आनंद मिळावा, अशी शंभूराजांची भावना होती. त्यांचे जीवन पाहता त्यांनी स्वत: जन्मापासूनच खडतर आयुष्याला सुरुवात केली. संकटे क्षणोक्षणी दारावर धडक्या मारतच असत. सरला दिवस आपला हे जगणे त्यांना नवे नव्हते. इत:पर मानवी जीवनात कोणत्याही क्षणी मानव जेव्हा आपल्या कामाचा व आयुष्याचा आढावा घेतो, तेव्हा त्याला मानसिक समाधान तसेच मानसिक ताण देणारे प्रसंगही आठवत असतातच. गोतम बुद्ध वा सम्राट अशोक, संत नामदेव वा संत तुकाराम, संत कबीर वा संत रविदास यांचे जीवन अत्यंत सुखी-समाधानी व आनंदी होते; परंतु त्यांच्यासमोर असलेल्या सामाजिक समतेच्या आनंदाचा डोह निर्मितीच्या कार्यात त्यांना समाज साथ देत नव्हता. चळवळीमध्ये काम करणाऱ्या लोकांना अपेक्षित यश दिसत नाही. यापेक्षा ज्यांच्यासाठी वा ज्यांच्यासमवेत ते लोकजीवन आनंदी होण्यासाठी धडपडत असतात तेच विरोध करतात. याची खंत वा बोच खूप मोठी असते. त्यांचा प्रचंड मोठा मानसिक धक्का नेत्यासह सर्वांनाच बसतो. त्यातून त्यांची मानसिकता हतबलता, मानसिक ओढाताण व अगतिकता तयार होत असते. संतांचे जीवन शांतीसाठी होते; पण त्यात सतत संघर्ष होता. संतांचा वैराग्य, संन्यास याला विरोध होत. सत्याचा हव्यास हाच संतांचा जगण्याचा मार्ग होता. तरीही मराठीतील तथाकथित तत्त्ववेत्यांनी, साहित्यिकांनी, संशोधकांनी, संतांना टाळकुटे संबोधून हेटाळणी केली. नेमके त्याच पद्धतीने सातशतककडे पाहून छत्रपती संभाजी महाराजांना उत्तर आयुष्यात वैराग्याची आस लागली असेल असे म्हणण्यासारखे आहे.

"नाचू कीर्तनाचे रंगी। ज्ञानदीप लावू जगी" असा जयघोष देशभरात चारवेळा भ्रमण करणाऱ्या संत नामदेवांचा विचार पंजाबमध्ये स्वीकारला गेला. तेथे समताधिष्ठित शीखधर्माची स्थापना झाली. जगात प्रत्येक देशात शीखबांधव पोहोचले, पण ज्या वारकऱ्यांसाठी संत नामदेवांनी चळवळ चालविली त्या महाराष्ट्रातील वारकरी नवा विचार स्वीकारायलाच तयार

नाही. मऊ मेणाहून मानवता जोपासणाऱ्या संतांनाच 'भले तरी देऊ गांडेची लंगोटी' म्हणण्याची वेळ येते. भारतीय साहित्यात तत्त्वज्ञान म्हणजे Philoso-phy या विषयाला अध्यात्म म्हणण्याची हुशारी कोणीतरी चलाखपणे केली. अध्यात्मातून व्यक्तिगत अनुभूतीचा वा लाभाचा परिणाम होतो. सामूहिक नाही. मोक्ष हा व्यक्तिगत आहे. सामाजिक मनावर हजारो वर्षांचा जो वैदिक पगडा आहे, तो युवराज संभाजीराजांनी शिवराज्याभिषेकसमयी अनुभवला. धर्माला धर्मानेच उत्तर देता येते म्हणून त्यांनी ६ जून १६७४ चा वैदिक विधीयुक्त शिवराज्याभिषेक नाकारण्यासाठी दि. २४ सप्टेंबर १६७४ रोजी रायगडीच शिवधर्म पद्धतीने म्हणजे केवळ बहुजन पुरोहिताकडून सर्व विधी करून दुसरा शिवराज्याभिषेक समारंभ घडवून आणला. वयाच्या सतराव्याच वर्षी इथल्या अभेद्य समजलेल्या पुरोहितशाहीला दणका देणारे शंभूराजे छत्रपती पद धारण केल्यावर मनाने खचणे शक्य नाही. इत:पर वडील छत्रपती शिवाजी महाराजांचा आकस्मिक व संशयास्पद मृत्यू, त्यानंतर व आजतागायतही स्वराज्याशी द्रोह करणारे मंत्री विश्वासघात करतात, अधिकाराने जवळ घेऊन चार गोष्टी सांगणारे बायको येसूराणीशिवाय कुणी नाही, सेनापती हंबीररावांचा मृत्यू, सर्व बाजूंनी वरचढ होत चाललेले अनेक शत्रू अशा सभोवतालच्या वातावरणामुळे कवीमनाचे छत्रपती संभाजी महाराज भावुक होणे स्वाभाविक आहे. सातशतकमधून त्यांनी विविध स्वरूपाच्या आराधना केल्याचे स्पष्ट होते. शिवधर्मी छत्रपती संभाजी महाराजांनी आत्मबळासाठी केलेले ते आत्मसंशोधन आहे. एकाकी जीवनामधूनही जोपासलेला तो छंद आहेच, पण सामाजिक मानसिकतेचा प्रमुख आविष्कार आहे. छत्रपती संभाजी महाराज शिवधर्मी असून त्यांना वैदिक हिंदू धर्माबद्दल चीड आहे असे वातावरण पुरोहितशाहीने निर्माण केले होते. त्यामुळे समाजमन धार्मिकतेबद्दल विशेष भावुक असल्या कारणाने ते अविचल राहण्यासाठीच छत्रपती संभाजी महाराजांनी थोडी भक्तीपूर्ण काव्यरचना केल्याचे स्पष्ट होते. त्यातूनच सातशतकचा जन्म झाला. सातशतकमधून आलेले विविध द्रेवदेवतांचा संदर्भ ही छत्रपती संभाजी महाराजांच्या दुर्बल मानसिकतेची अथवा पराभूत मानसिकतेची पदरचना नाही. आराधना वा आवाहन हे विजयासाठी असते, सत्तेसाठी असते, प्रजासुखासाठी असते, प्रजारक्षणासाठी असते. तसेच सामाजिक मनाला सामाजिक विश्वास देण्यासाठीही असते. आपला राजा हा आपल्यासाठी लढत असतानाच प्रजेला मानसिक आधार देतो. ही भावना राज्यकर्त्यांसाठी

आवश्यक असते. सतराव्या शतकातील समाजांचे चित्रण वाचकांना वेगळे सांगण्याची गरज नाही. अध्यात्म या शब्दाने आपल्याकडचे तत्त्वज्ञान मातीत घातले आहे. सातशतक हे तत्त्वज्ञान मांडणारे काव्य आहे. मनाची उभारी प्रदर्शित करणारे गीत आहे. जगद्गुरू संत तुकाराम महाराज व छत्रपती संभाजी महाराज यांच्या जीवनातील अनेक प्रसंगात साम्य आढळते. तसेच त्याचे प्रतिबिंब त्यांच्या साहित्यातही आढळते. साक्षात मृत्यूला नमवणाऱ्या या नरश्रेष्ठांना वैराग्याचे वारे शिवू शकत नाहीत. म्हणजेच सातशतक हे आनंदगीतच आहे.

छत्रपती संभाजी महाराज या बत्तीस वर्षांचेच आयुष्य लाभलेल्या व त्यातील एकही क्षण स्वत:साठी न जगलेल्या क्षात्रवीराचे साहित्य एकत्रितपणे अल्पस्वरूपात का होईना आज मराठी वाचकांसमोर येत आहे. भारतीय समाजमनावर बळीराजा, बुद्ध, श्रीराम, श्रीशिवाजी अशा शिववंशीयांचा जो ठसा आहे, त्याच मालिकेतील छत्रपती संभाजी महाराज हे नाव आहे. औरंगजेब बादशहाच्या कैदेतून साक्षात् मृत्यू समोर असतानाही ज्याने मृत्यूलाच नमवले ते छत्रपती संभाजी महाराज हळवे असू शकतात. कारण, त्यांनाही मन होतेच. त्यातूनच एक प्रतिभासंपन्न साहित्यिक निर्माण झाला. तलवार व लेखणी तेवढ्याच विश्वासाने चालविणाऱ्या या लोकराजाचे लोकसाहित्य शंभूप्रेमींनी वाचावे हीच विनंती. डॉ. प्रभाकर ताकवले सर व त्यांच्याकडून हे शंभूकार्य करून घेणारे जिजाई प्रकाशन पुणे,चे शिवश्री किशोर कडू यांचे विशेष आभार मानून थांबतो. वाचकांनी आपल्या प्रतिक्रिया अवश्य पाठवाव्यात. जय जिजाऊ!!!

दि. २१ एप्रिल २००९, पुणे
(सत्यशोधक देशभक्त केशवराव जेधे जयंती)

**पुरुषोत्तम खेडेकर**
संस्थापक अध्यक्ष,
मराठा सेवा संघ

# भूमिका

## नृपशंभू कवींच्या तीन काव्यसंगमावरून

अदृष्ट परमेश्वरी शक्तीच्या किंचित कृपाप्रसादाने नव्या तृतीय सहस्त्रकाच्या व एकविसाव्या शतकाच्या भल्या प्रारंभिक काळातच (पहिले दशक व आता नवीन वर्ष) आम्ही पुणेकर व सासवडकर 'पुरंदर-वज्रगडच्या' नवप्रणयात आकस्मिक धुंद झालो. पुरंदर मित्र मंडळाची स्थापना झाली. पुरंदरचे अस्सल ओझोन (शुद्ध ऑक्सिजन) ही मंडळी होती. श्री शिवराज्याभिषेकदिनाच्या आदल्याच दिनी असलेल्या या ज्येष्ठ शु।। द्वादशीच्या शुभकाली महाराष्ट्राचे फार फार लाडके सुपुत्र शंभूराजे यांचा जन्म याच शुभस्थानी झालेला! समोर चंद्र सूर्य नामाने अजूनही आसमंतातील रानबहिऱ्या रहिवाशांच्या वावराने पावन झालेल्या व पुरंदर वज्रगडालाही वाकुल्या दाखविणाऱ्या (प्रथम सोनेरी) चंदेरी किरणे झेलण्याने अजस्त्र मनोहारी टेकड्या (खरे तर उंच डोंगरमाथे) आहेत.

या मंडळाचे बीजारोपण २००१ ह्याच शिवसाथी नरवीर बाजी पासलकर यांच्या ३५० व्या पुण्यतिथीसच सासवडच्या चांदणी चौकात दिवसाढवळ्या झाले होते. हा बीजांकुर भलताच तरारला. होनहार वीरवान के होत चिकने पात। (फोफावणाऱ्या वृक्षराजाची पाने प्रारंभी फार मऊ व सुदृढ असतात. याचा अनुभव त्यातील अनेकांना सतत गेली ८/९ वर्षे येतच राहिला.

हिंदपुत्रांनो, स्वतःला लेखिता का बापडे ।<br>
भ्रांत तुम्हा का पडे । वीर बच्चे फाकडे ।।

अशाच अनेक धुनींचा अनुभव प्रतिवर्षी किल्ल्यावर येऊ लागला. या पुरंदरप्रेमी सानथोर चमूने उगाचच मजसारख्या डोंगरी जिवास आघाडीवर ठेवले. माझी बरीच त्रेधा उडाली. फार तर रणशिंग वाजल्यावर, बिगुल घुमल्यावर सावध राहायचे एवढीच माझी कुवत. पण शंभू युवराजांच्याबद्दल साऱ्या महाराष्ट्रातच पुनर्जीवन, पुनर्मूल्यांकनाचे वारे वाहू लागल्याने ते पुरंदरभोवती घोंगावू लागले. 'बुधभूषण'मधील 'यस्या:कटाक्षमात्रेण जायन्ते विबुधाः नराः' जिच्या कटाक्षमात्रेनेच माणसे शहाणी होतात, हे साक्षात् भवानीमातेचे रूप या युवा राजपुत्राने आपल्या प्रचंड ग्रंथदीपात 'बुधभूषण' या राजरत्न मंजुषेत

मांडले होते. पहिल्याच वर्षी या ग्रंथाने मला झपाटले व पुढे २/३ वर्षे साऱ्या बुधभूषणाचेच विहंगावलोकन झाले. नंतर प्रकाशन पुरंदरवरच झाले. अगदी सतत आठ वर्षे चढत्या क्रमाने अनुवादाचे काम होत होते. २००७ मध्ये शंभूराजांच्या ३५० वा जन्मोत्सव, भवानी स्तोत्राचा (संस्कृतच) ठाणे येथील शंभूप्रेमी नृत्यकलाभिज्ञ शिष्य-स्वामिनींनी साभिनय व पूर्ण वाद्यादि, प्रसंगोचित वेषासह सादर केला. भवनीमातेचे थरारदृश्य स्वत: त्रिशूलादि आयुधासह बुधभूषण बरहुकूम आपल्या शिष्य-शिष्यावृंदासह सादर केला. संस्कृतमधील शंभूराजांचे संपूर्ण भवानी स्तोत्राचा स्तुतिपूर्व 'इथे शरमले देवत्त्वहि या शूरत्वाच्या तेजात' हे आमच्या सचिवांची (ॲड. अनंत दारवटकर) स्वलेखीची मराठी वीररसोत्फुल्ल गानवंदनाही झाली. प्रतिवर्षी शाहीरवृंद (सान-थोर) हजेरी लावतच होते, पण ३५० व्या वर्षी (जयंती उत्सव) संपूर्ण बुधभूषणाचा मराठी अनुवाद आकार घेऊ लागला. त्याच वर्षीच्या गांधीजयंतीस पुण्याच्या बालगंधर्व रंगमंदिरात महाराष्ट्राचे जलसंपदा मंत्री ना. अजित पवार यांच्या हस्ते त्याचे भव्यदिव्य प्रकाशनही झाले. त्यावेळी संपादक व अनुवादक अमेरिकेत होते. इश्वरेच्छा बलीयसि, पुण्याचे शिवशंभूप्रेमी मोळक कुटुंबीय व शिवश्री खेडेकरांचा त्यात सिंहाचा वाटा.

आता राहता राहिले शंभूराजांचे हिंदी-काव्य. त्याचेही संपादन व अनुवादन यथोचित संशोधनासह करण्याचा मानस अनेक शंभूप्रेमींनी केला. मधुमक्षिका व्रताने माझ्या हाती (जुनाच अनुवाद संशोधनादि कार्यकर्ता) जेवढे लागले ते गेली दोन वर्षे (कराल कालच्या दंष्ट्राजारातून जाण्यासहचा काल धरून) मी केले. 'बुधभूषण'सारखाच हा अनुभवही फार न्यारा होता. शृंगार भक्ति (रास काव्य तुल्य) व भक्तिरसातील शांतिअभिमुख 'कन्हैया मेरी नैया लगाओ पार' हे ब्रजभूमीतच दोन-रात्री ऐकलेली २०-२५ वर्षांपूर्वीची धून देहात गुंजारव करीत होती. ब्रजभाषेतील रसखान व प्रारंभिक हिंदीतील अवहट्ट (अपभ्रंश) कवी विद्यापती व गीतगोविंदकार जयदेव यांच्या भाषाविषयक तौलनिक अभ्यासाचे दोन पीएच. डी.च्या छात्रांना ५/६ वर्षे सतत मार्गदर्शन व त्यांच्याबरोबर अनेक हिंदी बोलीभाषांचे बारकाव्यांचे अध्ययन झाल्याने हा अनुवाद सहज होईल (बाये हाथका खेल- सहज साध्य) असे वाटले. हिंदी-जीवी सतत ३५ वर्षे असल्याने अहंभावही होता. पण शिवधनुष्य स्वयंवर उत्थानास लागल्यावर या श्रीराधा-कृष्णांच्या युगल काव्याचा नायिकाभेद व श्रीराधाजींच्या नखशिख वर्णनाकडे संपादन, संशोधन व अनुवादाकडे वळल्यावर

हे साधे व सरळ बोलीतील काव्य ''टेढी लकीर खींचना सीधा काम है लेकीन सीधी लकीर खींचना टेढा काम है'' याचे प्रत्यंतर आले. सातशतकचे वेळी तर सारीच आव्हाने अनेकानेक पौराणिक कथांचे, शलाका न्यायाचे संदर्भ! त्यातही मी रुग्ण शय्येवरूनच या कामाचा पाठपुरावा करीत होतो. Spirit is young but flesh is old (चेतना तरुण पण शरीर (मासग्रंथी) जराजीर्ण!) तरीही काही इप्सितासह नौका किनाऱ्यास आली. यंदाचा दसरा-दिवाळी-नाताळ यातच हा काळ गेल्याने कराल काळही थबकल्यासारखा वाटला. सध्या तर या जन्म- मृत्यूच्या एका विवरातून बाहेर आल्याची माझी धारणा आहे.

**हिंद पुत्रांनो स्वत:ला लेखिता का बापुडे।**
**भ्रांत तुम्हा का पडे, वीर बच्चे फाकडे।।**

ही माझी आवडती काव्यपंक्ती व अशाच अनेक वीररसाने ओथंबलेल्या १. इतिहास मराठ्यांचा स्मरणात कसा नाही? २. कोलंबसाचे गर्वगीतातले

**हजार जिव्हा तुझ्या गर्जूदे प्रतिध्वनीने त्या ।**
**समुद्रा डळमळू दे तारे।**

आणि नंतर समुद्रालाच काही आव्हाने देणारे

**अनंत आमुची ध्येयासक्ति, अनंत अन् आशा।**
**किनारा तुला पामराला।।**

अशा जुन्या आणि अलीकडील

**सह्याद्रीचा सिंह गर्जतो शिवशंभू राजा।**
**दरी-दरीतून नाद घुमवितो महाराष्ट्र माझा।।**

या सारख्या जुन्या-नव्या मराठी मायभाषेतील व राष्ट्रभाषेतीलही (आझाद हिंद फौजेचे नेताजी प्रेरित)

**कदम कदम बढाया जा, खुशी के गीत गाए जा।**
**जिंदगी है कौम की, कौम पे लुटाए जा।।**

आणि गांधीजींच्याबद्दलचे

दी उसने जीवन की चादर उतार।
बापू का मरना, लाख जिनों से जोरदार ।।

अशा सारख्या काव्यपंक्ती रोज सकाळी सामोऱ्या येत.(मन:चक्षू समोर) मनात शंभूराजांचा शेवटचा काळ, त्यांचे बालपण, तरुणपण आणि जीतेजागते सारे विविध रसांनी चिंब झालेले जीवन या दुसऱ्या बालपणात (Oldage is

second childhood वृद्धापकाळ हे दुसरे बालपण आहे.) सतत समोर असे. पुरंदरकडच्या सात ते आठ वर्षांतील विविध धारातीर्थांच्या वाऱ्यांनी हा भलताच संचार अंगी याही उतारवाटेवर होतच होता.

आणि एके दिवशी नायिका-भेद च्या २७ व नखशिखच्या ३ पदांचा कवी कलशांच्या एका अद्भुत, शृंगाररसाभिमुख पदासह एकूण ३१ छंदांचा नृपशंभू अर्थात युवराज शंभूछत्रपतींचा ठेवा हातात आला. तो देणाऱ्या प्रा. रा. आ. कदम यांनी 'तुम्ही हिंदीचे आहात.' हेही भाषांतर करून टाका. असे मित्रप्रेमाने फर्मावले. येथून पुढे सर्व शेष सामर्थ्यासह हिंदी-संदर्भ शोधू लागलो. श्रद्धेय डॉ. भगीरथजी मिश्र यांचे पीएच.डी.चे विद्यार्थी डॉ. कृष्ण दिवाकर यांनी भोंसला दरबारच्या हिंदी कवीवर काम केले होते ते मिळविले. त्यातील बनारस-कलकत्ता-दिल्ली इ. पत्त्यावर यापूर्वीच धडकणे जरूर होते; परंतु आता शरीराने लाल दिवा लावल्यावर काय करायचे? तरीही पू.जिजाऊप्रेमी व शिवशंभूंच्या नवपाईकांनी मला उमेद दिली. २/३ महिने पुनश्च हरि ॐ म्हणून या दुसऱ्या पुण्यपर्व कालात मी प्रवेश केला. त्यात सर्वच जुने साक्षीदार, नवे ब्रिगेड्स, घरची सर्व मंडळी, पै-पाहुणे फार जाणकार, वैद्य मंडळी "शरीराचे आता ऐकत जा" मग काय करायचे ते करा म्हणाली. पण पुन:श्च पूर्व सुकृताचा ठेवा म्हणून जणू या दुसऱ्या एका देवदत्त कार्याकडे मी वळलो. ही काव्यगंगा शंभूराजांचीच हिंदी ग्रंथांच्या (राधा कृष्णाच्या लीलागानाच्या) व अनेक भारतीय पूर्वासुरींच्या (सातशतकातील) छंदोबद्ध झालेल्या त्रिपथगेत मी प्रथम पुष्कळच घोटाळ्यात पडलो. आवर्तनात आधीच सापडलेले 'शंभू चरित्र' या काव्यलीलाने आणखीच गर्द होऊन अफवा-आरोप इ. शृंगाररसांचा पंकोद्भव करणार नाही ना? वैरी न चिंती ते मन चिंती।

शंभूराजांच्या रूपवर्णनात्मक भवानी स्तोत्रावरही हा (अश्लील) शृंगारिकतेचा आरोपाचे धाडस एक नवशिक्या चरित्रकाराने केलेलेच होते; परंतु 'जेथे जेथे असे पराक्रम तेथे तेथे प्रेम (व शृंगारही) वसे' असे श्रीकृष्णांचे ही जीवन समोर चमकले. खास ब्रजभूमीत काही दिवस हा गोप-गोपीच नव्हे तर कालियामर्दनाचे नाट्य मी 'यमुना तेरे किनारे आए है लोकदलवाले' हा आल्हा ध्वनी हिरव्या शिरपेचवाल्याकडून ऐकला होता. वृंदावनातील वास्तव्यात स्वर्गीय चरणसिंगजींच्यासह आणखी बरेच पाहिले व ऐकले.

पाहूया गोकुळाचा कन्हैया व वृंदावनचा "बाँके बिहारी" हा बरसानेच्या

राणी (राधा) समवेत महाराष्ट्रात धिटाईने न्यायचाच हे ठरवले. अनुवादाकडे मनोभावे वळलो. पहिल्या प्रयत्नापेक्षाही पुष्कळ पाठिंब्याने, घरचा-दारचा स्नेह उदंड मिळाला. कुणाकुणाची नावे लिहू? या शब्दयज्ञात जुने मदतकार, मोळक दाम्पत्य, पुरंदर मित्रमंडळाच्या सारा परिवार, ताकवले कुटुंबीय, जिजाऊ स्फूर्तिगाते शिवश्री पुरुषोत्तम खेडेकर व जिजाई प्रकाशनचे शिवश्री किशोर कडू व त्यांचे सहाय्यक भाऊ मडके, गणेश जगताप आणि शंभूप्रेमी कार्यकर्ते व नेते कितीतरी! त्यातील काही भक्त काशीपर्यंत या शोध ग्रंथासाठी धडकले आहेत. माझीही पुन:श्च यासाठी बनारसभेटीची फार मनीषा आहे. तोपर्यंत आजच्या संकलित शंभू-काव्य फुलांची दुसरी अंजुली (ओंजळ) मी महाराष्ट्राच्या जनताजनार्दनापुढे मनोभावे ठेवत आहे. ही बेलपाने नेमकी तीनच आहेत. त्रिदल हा योग जुळून तर आला आहे. शंभूकृपेची झलक आहे. अशी माझी धारणा आहे. थोडी घाई केल्याने काही अनगढपणा आहे. पण पाखरे पीक संपविण्याच्या आतच काही शिवार सावरलेच पाहिजे ना?

हे तीनही शंभूराजे रचित ब्रजग्रंथ वाचताना 'मोसो कौन कुटील खल कामी?' (माझ्यासारख्या कोण दुष्ट व कामातूर आहे?) हे पद (आत्म्याच्या भानाने लिहिणारे संत शिरोमणी सूरदास नेहमी ध्यानात ठेवले पाहिजेत अन्यथा अभिधा अर्थाने फार गडबड व कमालीचा अन्याय शंभूपरिवारावर होईल.) हे आग्रहाने सांगताना संत तुलसीदासांचेही

**तुमसो खरो है कौन मोसो खोटो।**
**तुमसो बडा है कौन, मोसो छोटो॥**

हे प्रभू रामचंद्राशी स्वत:ला तोललेले विधानही समोर असलेच पाहिजे. श्रीमंत मनाची व अध्यात्मिक अंत:करणाची साथ असल्याशिवाय हे तीनही ग्रंथ सहजासहजी नीट भावणार नाहीत.

या फार फार परतत्त्वस्पर्शी राधाकृष्णाच्या व ते लीलया जाणणाऱ्या शंभूराजांची ही जवळीक साधण्याच्या प्रयत्नात नाना मित्रमंडळी मला नेहमी प्रोत्साहन देत होती. मराठा सेवा संघासोबत आमच्या पुरंदर मित्र मंडळाचे यच्चयावत साथ देत होते. यापूर्वीच त्यांचा नामनिर्देश केलाच आहे. पण प्रति व्यक्ती म्हणून प्रा. रा. आ. कदम, ॲड. दारवटकर, श्री. बा. ग. पवार, डॉ. शालिनीताई मोहोड, श्री. दिलीप डिंबळे, श्री. माणिकराव पासलकर, श्री. राम पायगुडे, विकास पासलकर, शाहीर दादा पासलकर, श्रीमंत कोकाटे इ.

कार्यकर्ते तसेच श्री. बनबरे, प्रवीण गायकवाड, श्री. प्रमोद मांडे व आणखी अनेक अनामिक मजसोबत आहेत. त्यांच्या स्नेहप्रसादाचे हे इप्सित आहे. मराठी भाषेतील जनताजनार्दनाच्या करकमलावर ही माझी कोरांटीची शब्दफुले, शिवशंभू प्रेमीसाठी मनोभावे वाहताना, पुनःश्च आणखी नवनव्या संशोधित सामग्रीसह भेटण्याची आस बाळगून आहे.

**–डॉ. प्रभाकर ताकवले**

# संपादकीय

## श्री शंभुराजे भोसले कृत 'नायिकाभेद' च्या दर्पणात (प्राक्कथन)

प्राप्त झालेले एकूण २७ +१ सवैया व कविता छंदात रचलेले श्री शंभू छत्रपती यांचा काव्यग्रंथ 'नायिकाभेद' रीतिकालीन हिंदी साहित्यात सम्मानित झाला आहे. दहा तऱ्हेने आपले कविनाम त्यांनी या काव्यात गुंफले आहे. संभु, शंभु, कवि शंभु, कहि शंभु, शंभु कहे, कवि संभु, नृप शंभुराजे, नृप शंभू, संभुराजे अशा दहा प्राकृत तऱ्हेने ही नावे गुंफली आहेत. 'निरंकुश: कवय:' ही उक्ती स्वनाम योजनेत आपणास या काव्यात आढळते. सर्वात अधिक क्रमांकाने अकरा वेळा 'शंभु' हे नाव (२, ४, ७, ११, १३, १४, २०, २१, २४, २६, २७) वापरले आहे. डॉ. कृष्ण दिवाकरांनी 'नृपशंभु' हे पाच वेळा वापरलेले नाव (क्र.१२,१८,१०,९,६) विवेचनार्थ घेतले आहे. अंतरंग व बहिरंग परीक्षणाने हे 'नृपशंभु' कवी दुसरे तिसरे कोणी नसून त्यांनी शिवरायपुत्र छत्रपती संभाजी होत, हे ऐतिहासिक पुराव्यासह प्रतिपादन केले आहे.

युगलप्रेमी, श्रीराधिका व ब्रजरत्न श्रीकृष्ण यांच्या संदर्भातील हे काव्य आहे. श्रीलीला स्वामिनी राधिकाजींच्या विविध नायिका प्रसंगातील हे वर्णन आहे. त्यात ओळीने धोबिन (११, १२) संन्यासिनी (१३) मालिन (१४) व नाइन (१५) अशा दूती आपणास मिळतात.

संस्कृतातील जयदेवांचे (गीतगोविंद) पुढील आत्मभान आपणास देते.

**'यदि हरि स्मरणे सरसं मनो। यदि कलासु विलासु कुतूहलम्।।**
**मधुरकोमलकांत पदावलीम्। श्रुणु तदा जयदेव सरस्वतीम्।।'**

शंभुराजांच्या'नायिकाभेद' व 'नखशिख'मध्ये ते आपणास दोन्ही काव्यात मिळते. जयदेवांच्या ब्रजावतारी गीतगोविंद या काव्याच्या रूपात आपणास हमखास सापडते मधुराभक्तीच्या ब्रजबोली आविष्काराबद्दल पहिल्या सवैयाच्या विवेचनप्रसंगी प्रारंभीच ही धारणा संपादकाने विशद केली आहे.'शिवं भूत्वा शिवं यजेत्।' शिवरूप होऊनच शिवाची पूजा करावी याच धारणेने राधा-कृष्ण काव्याचे आस्वादन घेण्याची प्रथा आहे. श्री शंभुराजांचे हे काव्यग्रंथही त्याच भावाने ग्रहण केल्याने त्यातील अंतरंग खोलीपर्यंत वाचक जाऊ शकतात.

'नायिकाभेद' व 'नखशिख' हे दोन्ही काव्यग्रंथ काही से **रीतिबद्ध** तर 'सातशतक' हा आशयाच्या दृष्टीने **रीतिमुक्त** म्हणता येतील. राधा-कृष्ण भक्तिकाव्याच्या संदर्भात, नि:संशय हा पहिला ग्रंथ श्री राधाकृष्णांच्या

शृंगाररसाचेच विवेचन करताना आपणास आढळतो. याविषयी अंतरंग परीक्षणात या काव्यात युगलप्रेमींची विविध नावे व ब्रजभूमीतील त्यांच्या रासलीलेची स्थळे आपणास या सर्व २७ पदांत सापडतात. त्यांचे विवेचन पुढीलप्रमाणे आपणास आढळते.

प्रथम सवैयातच **'दोउ'** हा युगल अर्थाचा शब्द सहा वेळा (पहिल्या व दुसऱ्या आणि चौथ्या ओळीत प्रत्येकी दोनप्रमाणे) मिळतो. दुसऱ्या सवैयात **'राधिका–कान्हा'** हे युगलनाम पहिल्या पंक्तीत तर **'लालन'** हा दोन्ही प्रेमींच्यासंदर्भात तिसऱ्या ओळीत अर्थ लालित्यासह वापरलेला आढळतो. युगलनामातील स्वतंत्र उल्लेख पुढीलप्रमाणे आपणास मिळतात. छंद क्र.३ (नवेलिका–राधेचा सांकेतिक संदर्भ) त्याचप्रमाणे **'सुजान'** हा श्रीकृष्णासाठीच उपयोजित विशेषणार्थ संज्ञा आहे. **'हरि'** हा चौथ्या छंदातील चौथ्या ओळीतील स्पष्ट उल्लेख आहे. क्र.५ मध्ये **'नलिनी–विधु'** हा संकेतनामक युगलप्रेमींचा उल्लेख आहे. 'गुपाल हे क्र.६ मधील तर क्र.७ ची जमुना की नहायबो' व **'गोकुलकुंभ'** ही स्थलनावे आणि 'नंदलला' ही श्रीकृष्णांची बालपणची संज्ञा (आवडती) आहे. हरि नावाचा उल्लेख क्र.८ मध्ये स्पष्ट दिसतो. तर पुढे ब्रजनाथ या नामाबरोबर 'कुंजलीला' व मुरलीबरोबर गोपबद्ध ही त्या गानलीलेत बांधली आहेत. छंद क्र.१० मधील अंतिम पंक्तीतील 'लाडिली' ही विशेषणवाचक संज्ञा, राधेबद्दलच पूर्णत्वाने योजिलेले आहे. छंद क्र.११ मध्ये **कालिंदी**–(यमुना )तीर व कान्हा संदर्भ, तेथील धोबीन दूतीने दिला आहे. याच दूतीच्या वृत्तांताचा धागा पकडून क्र.१२ व्या छंदात आपणास **'लालह'** (लाल) हे कृष्णासाठी वापरलेली संज्ञा मिळते. पुढील क्र.१३ च्या संन्यासिनी दूती असलेल्या छंदात **'कान्ह'** वृषभान भौन (राधेच्या पित्याचे घर ) सहेलिनी राधिका व ब्रजकी ठकुराइनचा उल्लेख आहे. नंतरच्या क्र. १४ व्या सवैयामध्ये कृष्णाबद्दल नंदलाल व दोन वेळा हरि मिळतो. राधेबद्दल ''बालनई'' हा संकेतात्मक उल्लेख आहे. पुढच्या क्र. १५ व्यात **'राधिकाके'** व **'कान्ह'** या दोघांचा आणि लाल हा एकदा कृष्णासाठी तर **लली, लुनाई** हा राधेसाठी खुबीने वापरता आहे. लाज व काम हे पुढच्या छंदात (क्र.१६) विशेषनाम म्हणून वापरले आहेत. नंतर ( क्र.१७) मोहन हे कृष्णनाम प्रौढरतिमध्ये उपयोजिला आहे. **प्यारी व अरविंद** हे पुनश्च विशेषनाम आपणास (क्र.१८) आढळते. क्र.२०–२१ छंदात **लला, लली व लाल ही** प्रथम दोन राधेसाठी तर लाल हे श्रीकृष्णांच्यासाठीच वापरलेली खास विशेषण संज्ञा आहेत. नादमाधुर्य हे येथे वापरलेले आहे.

**'बलि जाऊ लला इन बोलनकी।'** असे तुलसीदासांनाही कवितावलीत आपल्या आराध्य (राम) संदर्भात लिहिण्याचा मोह झालेला आहे. नंतर या अनाम युगललीचे काही छंद संपल्यावर क्र.२५ मध्ये आपणास पुन:श्च **वृषभान सुता** (राधा) व **जमुना में श्यामनदी** व **श्याम** (नुरमे) चा उपमा-उपमेयाही वापरून केलेले अलंकारिक व मनोहारी वर्णन मिळते. 'मृगनैनी' हा क्र.२६ मधील राधेचा संदर्भ चपखलपणे वर्णिलेला आहे. शेवटच्या (क्र.२७) रूपगर्विता नायिकेच्या छंदातील कवित्व छंदात, नंदगावच्या **'रूपवती'** वनितानचा स्पष्ट संकेत राधेबद्दलच आहे. याच कवितेमध्ये **'रीसी कुबराई'** हा राधेच्या **कुबरी-लीलेचा** (कुबर काढून भाव करण्याचा) फारच कृष्णाभिमुख कुबरी नायिकेच्याकडे संकेत करून धमाल उडवून दिली आहे.

एकूण नायिकाभेद राधा-कृष्ण भक्ती व रासशृंगाराची फार चित्ताकर्षक काव्यरचना आहे. **श्रीमंत (मनाचे) वाचकच या ऐश्वर्याची दखल घेऊ शकतात.** अनेक ठिकाणी रीतिकालीन सुख्यात कवी बिहारीलाल व रसखानजींची आपणास हटकून आठवण होते. परिशिष्ट १ मध्ये अधिक स्पष्टीकरणासाठी मानक ग्रंथातून (हिंदी साहित्यकाबृहत् इतिहास खंड ६ संपादक डॉ. नगेंद्र) काही भागाबद्दल माहिती दिली आहे.

'पुन:श्च शिवं भूत्वां शिवं यजेत्' ची आठवण या शिवपुत्राच्या येथे काव्य समाप्तीच्या वेळी होते. हे हटकून म्हणावेसे वाटते. हे खरोखरच सिंह शृंगारात्मक काव्य आहे. *डॉ. हजारीप्रसाद यांनी दिलेला दृष्टांत या केसरीनीच्या (सिंहिणीच्या) दुग्धाबद्दल पुन:श्च स्मरणीय आहे. सोन्याच्या कटोऱ्यात किंवा छाव्याच्या वदनातीलच हे अनोखे दुग्धामृत आहे. अन्य धातूंच्या भांड्यात ते फुटल्याशिवाय* (\ $ct&) arhUra Zrhr. वेचक व मन अंत:करणाची भावश्रीमंती असल्यानेच ते आकलन होऊ शकेल. ज्या स्वभावोक्ती अलंकार व शृंगारसाचे साक्षात शब्द चित्रदर्शन देणाऱ्या या छोट्याशा हिंदी ग्रंथाचे मराठी रूपांतर सर्व मराठी वाचकांच्या करकमलावर ठेवताना आली. त्यांनाच 'बुधभूषण' च्या नंतरची पुढची ही वाटचाल अर्पण करीत आहोत.

**-डॉ. प्रभाकर आ. ताकवले**

२८ डिसेंबर २००८

# निमित्त दुसऱ्या आवृत्तीचे

छत्रपती शंभुराजेकृत 'नायिका-भेद, नखशिख व सातशतक' ची प्रथमावृत्ती दीड-दोन वर्षांतच महाराष्ट्रभर गाजत-गाजत संपली. अखेरीस डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विश्वविद्यालय औरंगाबादचे हिंदी विभागाचा २००९-१० सालचा मोलाचा सन्माननीय अनुवाद पुरस्कारही या ग्रंथास मिळाला. तेथील प्रोफेसर व अध्यक्ष डॉ. माधव सोनटक्के यांचे गौरवपत्र विस्तारभयास्तव गोपनीयच ठेवतो. महाराष्ट्र हिंदी परिषदेच्या ७-८ जानेवारीच्या (२०११) लासलगाव (यंदा गाजलेली कंदर्प-नगरी) संमेलनात (माझ्या अपरिहार्य अनुपस्थितीत) माझ्या मित्रांनी तो पुरस्कार स्वीकारला.

ज्या पुस्तकाने कदाचित शृंगार चर्चेची बलामत राजांच्या जीवनाप्रमाणे, अनुवादक रसिक चर्चकावर येण्याची धाकधुकी (माझ्या मनातील) साश्चर्य संपली.

आता तर पुढील संशोधनाचा अन्य अभ्यासकांचा मार्गही मोकळा झाला. महाराष्ट्रातील शंभूप्रेमी व अभ्यासकांनो कामास लागा. संपादक प्रभाकर पावडे व गंगाधर बनबरे वाराणसीपर्यंत धडकलेच आहेत. सर्वश्री पुरुषोत्तमजी खेडेकर शंख फुंकीत अभ्यासकांचा जयजयकार करीत आहेत.' ऊर्ध्व बाहून् विरोभ्यश्च नचकश्चित् श्रृणोति माम् '। ही त्यांची व्यासावस्था होऊ नये.

वस्तुत: King's English (राजाचे इंग्रजी) प्रमाणे, युवराजांचे व छत्रपतींचे हिंदी (बुधभूषणमधील संस्कृतही) आपणास आता उपलब्ध आहे. रसो वै स: । या दण्डकाचे साक्षात् दर्शन, ''शृंगार रस व शृंगाराच्या माथा पाय ठेवीजे'' या दोन्ही रूपात या त्रिदल ग्रंथात आपणास मिळते. एक तरी ओवी (ओळ) अनुभवावी असा हा सुयोग नवधा भक्तीप्रमाणेच मधुराभक्तीचेही अद्भुत दर्शन आपणास येथे होते. सूक्ष्मावलोकनाचे रूपदर्शन नखशिखमध्ये तर शांत रस व निर्वेद वृत्तीचे मनोहारी रूप सातशतकात गवसते. खरे तर ही त्रिरत्नांची अद्भुत पिटारी आहे.

विद्यापीठातील अभ्यासाचे दारही (भाषाध्यायन) औरंगाबादच्या पारख्यांनी उघडले. शंभरनंबरी भाषाप्रभू राजाही आपल्या दर्शनास अभ्यासकांसाठी जणू समोर आहे.

**पुनश्च शंभूराजांच्याच शब्दातच ।। संभ षोई महीपाल कहै सुनिए गोपाल।**
**हम हरि हाल तुम, सौ निहाल रहियतु है ।।२८ ।।** -सातशतक

(शंभूराजे म्हणतात-गोपाल श्रीकृष्णा ऐक मी माझी सारी जबाबदारी तुझ्यावर सोपवतो) -त्यांची आठवण रसिकांपुढे ठेवतो.

दुसऱ्या आवृत्तीचे पुनर्मुद्रण किशोर कडू व भाऊ मडके यांच्यामुळे सुकर झाले.

**-प्रभाकर ताकवले (अनुवादक)**

# तिसऱ्या आवृत्तीच्या निमित्ताने..

छत्रपती संभाजीराजांचे जीवन अंधारातून उषःकालाकडे येत आहे. त्यांची विविधांगी धडपड (कामगिरी) नवइतिहासाभ्यासक धुंडाळत आहेत. जुने वाडे-हुडे, दऱ्याखोऱ्यातील शंभूप्रेमी १४ मे रोजी अंतर्मुख होऊन, शंभूचरित्राचे अवगाहन करीत आहेत. हे नवजागरण महाराष्ट्राला आपली खरीखुरी आत्मभानाची जाण देत आहेत. शंभूसाहित्याचा अवतंस बुधभूषणसह, त्यांच्या हिंदीतील ''नायिकाभेद, नखशिख व सातशतक''चा हातभार लागला. दोन आवृत्या हातोहात संपल्या. ही तिसरी सुवर्णपिटारी. हिंदी कवीसूर्य सूरदासांची ''अद्भुत एक अनुपम बाग'' हे दिव्य लिलापद 'सूरसागर' किंवा सूरप्रेमीकडून मिळवून सूरदासांची 'राधा' कशी अद्भुत बागेसमान अलौकिक, सुंदरी (सर्वांग) आहे हे जाणून घ्यावे. त्यासाठी 'मधुराभक्ती' समजली पाहिजे. त्यासाठी 'पुष्टिसंप्रदाय' मार्ग आहे. ''मधुराधिपते आखिलं मधुरं'' हा कृष्णभक्तीचा धागा वाचकापुढे ठेवण्याशिवाय सध्या सन्मार्ग नाही. रात्र थोडी व सोंगे फार, हे भक्तिमार्गात (देशभक्ती इ.तही) आपण अनुभवतो. 'सातशतक' समजण्यासाठी तर उर्दू पर्शियनचा धांडोळा, त्या भाषांचे पंडित सेतुमाधवराव यांच्यातर्फेच घ्यावा लागेल, औरंगजेबाचे चरित्रकार (समकालीन) साकी मुस्तैदखान यांची पुढील काव्यपंक्ती वाचकांसाठी संशोधनार्थ ठेवतो व ही प्रस्तावना संपवतो. ''अजले शह सरवर्द व उफनाद पेश, कशां सुये दामे फना सैद रविझ'' (अर्थ - मृत्यू समोर आला की सावज आपणहून मृत्यूकडे जाते.)

बादशहा औरंगजेबासाठी सावज ठरलेल्यास कुणा कुणाचा हातभार लागला हे इतिहासात खोल खोल डूब घेणाऱ्यासच कळेल. शंभूचरित्राचा सूक्ष्म धांडोळा घेऊन, धाय धाय रूदन करणाऱ्यासच समजण्याची ती शक्यता आहे. ''माते महात्मे, तुझे तत्त्ववेत्ते, तुझे शूर योद्धे, तुझे सत्कवि'' असणाऱ्या श्री शंभूचरणी अब्जावधी वंदनेह प्रणाम, प्रणाम..

**–प्रभाकर ताकवले (अनुवादक)**

## पदानुक्रमणिका (नायिकाभेद)

# नायिकाभेद

## १. सवैया-(लीला हाव)

दोउ दुहूं पहिरावत चूनरि। दोउ दुहू शिर बांधत पागैं ।।
दोउ दूहू को सिंगारत अंग। गरे लगि दोउ दूहूं अनुरागैं ।।
'संभु' सनेह समोह रहे। रस ख्याlन में सिगरी निशि जागैं ।।
दोउ दूहूनसों मान करै पुनि। दोउ दूहून मनावन लोगैं ।।१ ।।

श्री संभाजीराजेकृत मधुरभक्तिप्रधान हिंदी काव्यग्रंथ 'नायिका-भेद' ची पहिली सवैया छंदातील प्रारंभिक मंगलचरणासारखी युगललीला (राधा-कृष्ण) रचना हा सगळा ग्रंथ शृंगार भक्तिप्रधान भावाने आकंठ भरलेला आहे. डॉ. हजारीप्रसाद यांच्या शब्दांत ही मधुराभक्ती ''सिंहनी के दूध समान है। यह सिंहनी के छौने के मुँह में ही अच्छी रहती है, या सोने के कटारे में । अन्यत्र वह फट जाती है।'' हे ध्यानात धरूनच या ग्रंथाचे परिशीलन केले पाहिजे.

**अर्थ :** युगलरूप श्री लीलाकुमारी राधाजी व लीलाकुमार कृष्णजी दोघेही एकमेकांस चुनरी (बुट्ट्यांचे रंगीत वस्त्र) परिधान करवीत (नेसवीत) आहेत. दोघेही आपल्या दोघांच्या डोक्याला( एकमेकांस ) शिरोपगडी (पाग) बांधत आहेत. हे दोघे एकमेकाचे शरीर शृंगारित आहेत.(हे करताना) एकमेकाच्या गळ्यात पडत आहेत. त्यामुळे विशेष प्रेम, प्रगट होत आहे. कवी'संभु' म्हणतात की, हा विशेष स्नेहसंमोहाचा प्रसंग आहे. त्यातील क्रीडेत सारसामध्ये त्याच धुंदीत सगळी रात्र (जागीच) जागूनच काढली जात आहे. हे दोघे एकमेकाशी स्नेहास्थितीचा मान (रुसणे -फुगणे इ.) पुनःपुन्हा करीत आहेत. नंतर एक दुसऱ्यास समजावतही आहेत. (मान निर्मूलनही करीत आहेत) युगल सरकार श्रीराधाजी व श्रीकृष्ण यांचा हा प्रारंभीचा भक्तिरसाने ओथंबलेला शृंगार भक्तिप्रधान सवैया छंद साक्षात स्वभावोक्ती अलंकाराचे मूर्तरूप आहे. तसेच शृंगाररसाचेही साक्षात शब्द - चित्रदर्शन (पेन-पिक्चर) आहेत. (श्रीमंत मनाचे वाचकच त्याचा रसस्वाद घेऊ शकतात.) मंगलचरण नसलेला हा काव्यग्रंथ प्रत्यक्ष पुढे आठवण करून देतो ती गीतेची!

## २. सवैया

राधिका कान्ह विरंची रची सब। लोकनकी सुखमा सबे सैलै।।
अंगके रंगन के ढिग जात व्है। जात है शंभु सबे रंग मैलै।।
लालनसों परवालनसों बँधी। लालन जानि पेरे बहि गैलै।
पाय धरे जितही वह बाल। तही रंग लाल गुलालसो फैलैं।।२।।

**अर्थ :** श्री राधाजी आणि श्री कन्हैयाजी या दोघांची जोडी जगत्‌निर्मात्याने सगळ्या पृथ्वीवरील पहाडातील सौंदर्य आणून तयार केली आहे. शरीराचे रंगावर सगळ्या सुंदर रंगाच्या छटा आल्या आहेत.(किनारी दिसत आहेत) असे शंभूराजांचे म्हणणे आहे. अत्यंत प्रेमाने, प्रवाळानेच अणू प्रिय गळ्यात बाह्यरागाने स्नेहरस मिळविला आहे. जिथे जिथे ही बालिका पाय ठेवते, तेथे तेथे लालीलाल गुलाल उधळीत आहे. तिच्या त्या मंद चालीने (तिचे शरीर नव्हे) तर प्रत्यक्ष लालीलाल धारण केलेली पृथ्वीच डौलत आहे असा भास होतो.

मुग्धा सुरतारंभाची ही संयोग शृंगारात्मक झलक श्री राधा व श्री कन्हैया यांची जगत्‌निर्मात्याने या पृथ्वीलोकांतील सर्व पर्वतातील सौंदर्यराशी एकत्र करून (जोडी) निर्मिती (रचना) केली आहे. त्यावेळी सगळे रंग जवळ ठेवले असावेत. श्रीशंभू राजे म्हणतात, 'त्या सगळ्या रंगांचा मिलाप तेथे झालेला दिसतो. या लाडक्यांना प्रवाळाने बांधले असावे. बाहेरच्या बाजूंनी (मार्गांनी) त्यांना घट्ट पकडून जणू रसच (स्नेहरस) काढला जात आहे. जिथे जिथे बाळे (उभयता) पाय ठेवतात तेथे तेथे लालीलाल गुलाबी रंगाची उधळण होत आहे. कुमारसंभवमधील सर्वोपमा द्रव्य समुच्चयेन। यथाप्रदेशे विनिवेशतेन।। या पार्वती वर्णनाचे हटकून स्मरण।।' इथे होते.

## ३. मुग्धा सुरतारंभ सवैया..

लै परियंक निशंक नवेलिकों। अंक में लाय लगे गहि गूमन।।
ऊहनसों कसिके 'कवि शंभु'। सुजान कों भेंटि लगे मुखचूंबन।।
गोरे करेरे तरेरे उरोजन। दो कर लागे लला झुकी झूमन।।
गुंजन लागो गरो गरबीलिकों। नीर भरी पुतरी लगि घूमन।।३।।

**अर्थ :** सुरत काव्य पठनापूर्वी या माधुर्यभक्तीची पृष्ठभूमी जाणूया, भक्त मीरा, बिहारी, कवी रसखान, भक्त चंडीदास, विद्यापती, संस्कृत कवी जयदेव

किंवा दक्षिणेच्या आंडाल कवयित्री वा सखी संप्रदायाच्या भक्तांच्या मनानेच या काव्याचे परिशीलन करावे लागेल. अन्यथा संत कविसूर्य कबीरदास यांच्या या भक्तिपंथात ''फिसलत पडी पिपीलिका। लोक लदावत बैल।।'' जेथे मुंगीही घसरते (या प्रेमपंथात) तेथे कोणी बैल जुंपतात. ही स्थिती होईल. नि:शंकपणे या चतुर नायिकेस पर्यकावर घेऊन व मांडीवरही बसवून श्रीकृष्णजी मनातल्या मनात (अंतर्नाद) गुंजन करू लागले. कवी श्री शंभुराजे म्हणतात, विस्मयकारक रीतीने आवळून या चतुर बालेस भिडून ते मुखचुंबन घेऊ लागले. तिचे गोरे गोरे कठीण तरारलेले स्तन दोन्ही हातात घेतल्याने ती बाला झुकली व हिंदोळे घेऊ लागली. त्यावेळी (कृत्रिम अप्रसन्नतेने) गर्वोद्धत बालिका (गूढ) गुंजन करू लागली आणि डोळ्यातील पुतळ्यात पाणी आणून घुमू लागली.

नीर भरी पुतरी, लागे घूमन। या अंतिम अर्धाली (अर्धी काव्यपंक्ती) च्या पृष्ठभूमीवरील 'गुंजन लागो गरोबीलिको' ही जवळची अर्धी ओळ व त्याच्याही वरची)

'गोरे करेरे तरेरे उरोजन, दो कर लागे लला झुकी झूमन' ही पंक्ती अनुप्रास अद्‌भुत अलंकारचे अद्‌भुत लेणेच नव्हे काय?

### ४. प्रौढा खंडिता

**घूमत नैन कढे मुख बैनन। झूमत निंदभरे अलसानें।।**
**अंजन औठ महावर भाल मरू। करि शंभु परो पहिचानें।।**
**गोद गहो तिनही जिनतें सब। रैन विनोद करे मनमानें।।**
**पाय न जाय परौ तिनहीके। रहे जिनके हरि हाथ बिकानें।।४।।**

(या सवैयातील तिसऱ्या पंक्तीनुसार रात्रीच्या वेळेची ही प्रसंगलीला आहे. तसेच स्वत: हरि तिच्या हातात (राधेच्या) आपण विकलो गेलो आहोत. अशी भावना वर्णिलेली आहे. 'माई लीनो इन योही मोल।' ही भावना संत मीराबाईंची पंक्ती येथे संस्मरणीय आहे.)

**अर्थ :** प्रौढा ही पूर्ण युवती (अधिक आयुपी) व खंडिता ही पतीमध्येच अनासक्त नायिकेची चिन्हे ओळखणारी नायिका आहे. हे दोन पूर्वगुणान्वित अशी ही प्रौढा-खंडिता नायिकेचा प्रकार येथे आहे. डोळे फिरवीत (राधा) ती तोंडाने काही (काही) बोलत आहे. आळसून, झोपाळून झिंगत आहे.

तिच्या ओठावर तिने लेप (लाली) लावलेला आहे व कपाळावर (भालप्रदेशावर) लाल रंग व टणकदार हातांनी ती आपला परिचय करून देत आहे, असे कवी शंभूराजांचे अवलोकन आहे. तिने आपल्या मांडीवर अवघ्या जीवांना घेतले आहे.(आधार दिला आहे. रात्रभर ती वाटेल तसा विनोद करीत आहे. (येथेच्छ प्रकारे) तरीही तिच्या पायात पाय नाही (पाय ठरत नाही) तिच्या हातात श्रीहरी विकला गेला आहे. पूर्णपणे काबूत (कह्यात) आहे. (वह अहीरका छोहरिया, छछीयाभर छाछपै नाच नचावै-रसखान).

## ५. परकीया ऊहा

**नलिनी विधु मध्यको औट करै। जूट फूटै जुटका उडावहिको॥**
**मन चूंबक बीचकों लोहा भयो। तहां दूसरो रुप दिरवावहिको॥**
**'कवि संभु' सनहेकी रीति यही। विच्छुरें जल मीन जियावहिको॥**
**गुनवारे गुपालकी आंखिनतें। अरुझी अखियाँ सार तजावहिको ॥५॥**

**अर्थ :** ब्याही पर, परपतीपर प्रेम कमलिनीवासी चंद्राला पाहून फुटन पडली. मध्येच विकसित झाली. तारांगणामध्ये समूहात तारा (चमकणारा) निखळून उडाला. मन चुंबकामध्ये लोखंड झाले.(घट्ट बिलगले) तेथे त्याने दुसरेच रूप दाखवले. कवी शंभूजी म्हणतात, प्रेमाची हीच तऱ्हा (रीजि) असते. पाण्यातून (बाहेर) निघालेल्या माशासारखी तिची तडफड असते. गुणी गोपाळाच्या (श्री गोपाळकृष्णाच्या स्नेहल) डोळ्यात गुंतून, त्या डोळ्यांच्या सरोवरात जाऊन डुंबून गेले आहेत.(गुणवान अशा स्नेहसरोवरात ते जाऊन गुंतून बसले आहेत.)

## ६. पूर्वानुराग

**सासु कह्यो दधि बेचनकोसुं। दई दुरवहाइ कहां तेधौं हा करी॥**
**मोहि मिलै 'नृप शंभु' गुपाल तमाल। तरै वह गैल जो सांकरो॥**
**मो तन ताकि बडी बडी आँखियानते। कांकरि लै फिर मोतन घाकरी।**
**कांकरि औडि सर्द करते पैं। करेजे कहां धौं गर्द गडि कांकरी॥६॥**

**अर्थ :** (पूर्व (पहिली) स्नेहाचे काही कामानिमित्त पुनर्स्मरण व अनुभव) (डॉ. दिवाकर प्रभृतींनी निवडलेली सवैया व खास ब्रजभाषा, शैली व प्रभावाचे काव्य) (वृंदावनामध्ये) एका सासूने एका सुनेस दही विकण्यासाठी उद्युक्त केले. या दुःखदाई सूचनेस तिने तत्काळ होकार भरला. (सदई सुखदाई-

नशिबाची सुखद हाक हा दुसऱ्या पाठभेदाचा अर्थ) त्यावेळी कवी शंभू म्हणतात, तमाल वृक्षाच्या तळी असलेल्या निमुळत्या गल्लीच्या ठिकाणावर माझ्याकडे तिच्यावरती मोठमोठे डोळे करून पाहणारा गोपाळ भेटला. तो माझ्या देहाकडे एक टक लावून पाहात होता. त्याने खडा माझ्याकडे टाकला मी तो अडवून धिमा केला. (हाताने अडवला) पण तो खडा तिच्या काळजामध्ये गच्च रूतून बसला. हृदयात जाऊन शांत झाला. (धौं = न जाने, वाक्यात जोर आणणारा शब्द) कसा काय तो काळजातच शिरला. (प्रेमाची ही न्यारी तऱ्हा कृष्णकाव्याची दृश्यात्मक खुमारी वृद्धिंगत करणारी आहे).

## ७. सवैया

**गाँव के सीग धरें सब नाम। चवाव चहूँ दिशिसें उनयो है।।**
**भीतर 'शंभु' सदा रहिये। जमुना को नहायवो छूटि गयो है।।**
**देखतही लगि जात कलंक। निशंक व्है काहुन अंकलयो है।।**
**गोकुल में अरि नंदलला। अबलान कों चौथिकों चंद भयो है।। ७।।**

**अर्थ :** गावामध्ये (गोकुळात) चारी बाजूस (सगळीकडे) अशी शिकवण सगळ्यांना दिली जात आहे की, नेहमी गावातच (आतल्या आत) रहा कारण, यमुनेवर आंघोळीच्या निमित्ताने (आंघोळीसाठी) नंदलाल कन्हैया (श्रीकृष्ण)(आपल्या सवंगड्यासह) सुटला आहे. त्याला पाहताच शत्रूंच्या मनात दोष निर्माण होतो? खरे तर नि:शंक होऊन कोणीतरी त्याला मांडीवर घेतले आहे आणि गोकुळात तर हा नंदाचा आवडता बाळ, अबलासाठी (गौळणींच्या, गोपींच्या साठी) चतुर्थीचा चंद्र (दुर्मिळ वस्तू) झाला आहे. (नंदलाल हे श्रीकृष्णाचे बालपणीचे संबोधन येथे फार मार्मिक वाटते) अरिचा अर्थ अरे! असे संबोधनासाठी घेतल्यास आणखी अर्थघनता आशयास येते.)

## ८. तृतीय अनुशयाना सवैया

**दूति संकेत गर्द बनको बदि। प्यारि पगी हरिके गुन गाथ में।।**
**गाय दुहावतकों कहि 'शंभु'। खरी खरिकान सखीनके साथ में ।।**
**केलि के कुंज बजी मुरली। बुधि गोपवधूकी बँधी ब्रजनाथ में।।**
**दोहिनी हातकी हाथे रही। न रह्यो मनमोहिनिकी मन हाथ में।।८।।**

**अर्थ :**(अनुशना-वहै परकीया नायिका जो मिलनस्थान के नष्ट होने से

दु:खित हो। हा कोशांतर्गत आहे.)

**अनुशयाना** प्रकारच्या नायिकेबद्दलची ही सवैया आहे. जगातील धूलिकणामुळे दुतीस असा हरीच्या (श्रीकृष्णाच्या) गुणगायनात वाढलेल्या प्रेमाचा संकेत मिळाला. कवी शंभू म्हणतात की, गाईची धार काढताना तेथे उभे असलेल्या सखीच्याबरोबर खिसकण्याचा (पळून जाण्याचा) संकेत मिळाला. शहाण्या गोपवधूला (राधेस) व्रजनाथजीं (श्रीकृष्ण) च्या बंधनात कुंजवनात केलि (नृत्य) करण्याचा संकेत मिळाला. त्यावेळी तिच्या राधेच्या हातातील रवि (ताक घुसळण्यास वापरात येणारी) हातातल्या हातात राहिली त्यावेळी त्या मनमोहिनीचे (राधिका) मन आपल्या हातात(ताब्यात) राहिले नाही.

## ९. सवैया प्रोषितपतिका

**बालमके बिछुरे बढी बालकें। व्याकुलता विरहा दुखदानतें ।।**
**चौपरि आनि रची 'नृपशंभु'। सहेलिनि साहिवनी सुखदानते ।।**
**तू जुग फुटे न मेरि भटू यहो। बात कही सखियाँ सखियांनते।**
**कंजूसे पानिसे गिरे। असुंवा गिरे खंजनसी अँखियानते ।। ९ ।।**

**अर्थ :** (प्रोषितपतिका-पतीच्या परदेशात असण्याने दुःखी असलेली नायिका ) (प्रेषितभर्तृका किंवा प्रवास प्रेयसी अशी शहाणी (सयानी), जाणती असाही कोशगात अर्थ आहे. आपल्या बालमच्या (वयाने लहान) विरहाने तिचे केस (केशकलाप) विस्कटले गेले आहेत. व्याकुळ झाल्याने (विरहामुळे) तिला दुःख होत आहे. नृपशंभू (कवी) म्हणतात तिने सुख (आनंद) मिळविण्यासाठी गंजीफाचा (चौपड) खेळ सख्याबरोबर आणून सुरू केला. हे सखी, तू माझी जोडी फोडू नक्रोस अशी (मानस) इच्छा ती सख्या-सख्यामध्ये प्रगट करीत होती. त्यावेळी (नेत्र) डोळ्यातून पाणी टपकत होते. जणू खंजन तल्म सुंदर काळ्या (कमल) कपाळी भोर डोळ्यातून हे अश्रू आले आहेत.

## १०. सवैया मध्या

**अलसात जम्हात अटापरतें। उतरें निशिमें करि केलि बडी ।।**
**दहि भांतिहि रावरो रूप लखै। उर आनंदराशि हिये उमडी ।।**
**'नृपशंभु' जू केसरिया दुपटा। सोतो मागति है अंगनामें अडी ।।**
**हतै हाँसि जेठांनि ललासों करै। उतै लाडिली लाज न जाति गडी ।। १० ।।**

**अर्थ :** आळस आणून जांभई देत गच्चीवरून ही प्रथम रजोवती। नायिका (मध्या) रात्रीच्या वेळी उतरून देखणे (निरनिराळ्या प्रकारचे) स्वरूप पाहून पाहून पेटून उठली (उत्तेजित झाली) नृपशंभू म्हणतात. ती आंगणातच (हट्टोन) उभी राहून केशरी रंगाचा दुपट्टा (उरोजवरून) आपल्या सवतीस मागत आहे. इकडे, मोठी स्त्री, लाडक्याबरोबर हास्य करीत आहेत तर तिकडे ती (मध्या नायिका) लाजून चूर होत आहे. (येथे युगल रूपाची मुक्त-निशा, लीला वर्णन केली आहे. अर्थात, नायक-नायिका, राधाकृष्णच आहेत. हे सांगणे सूज्ञ वाचकांस न लागे)

## ११. धोबीन दूतीवचन

**तीर कालिंदीके हौ उत 'शंभु'। सुखावतही पट धोय बगारयो ।।**
**तू बतराज हुति सुखियानसों। आज कहूँ ते उहो पग धारयो ।।**
**औंचक तूं हसि आनन फेरि। बडे बडे नैननि तानि निहारियो।**
**कान्ह अचेत परयो कहरै। सखि वादिन की मुसकानिकों मारयो ।।११ ।।**

**अर्थ :** कविराज शंभूजीने चितारलेली ही धोबीण दूती म्हणते की, यमुनेच्या काठी ती कपडे धुवून ते सुकवण्यासाठी पसरवीत होती. तेव्हा तू (राधा) सुखाने (आनंदाने) कुणा सखीशी तरी वार्तालाप (बातचीत) करीत होतीस. आणखी मी काही सांगत असेन तर तुझ्या पाया पडते. तू राधा अचानक तोंड फिरवून हसलीस आणि डोळे मोठे करून (विस्मयाने) एक टक पाहिलेस. त्यावेळी कान्हा (श्रीकृष्ण) मूर्च्छित पडला आणि म्हणाला, 'मी या सहेलीच्या हास्यामुळे (किंचित गोड हसण्याने) घायाळ (मृतवत) झालो आहे.' धोबीण (परीट) हीच दूतिका असलेल्या या दोन्ही सवैया अर्थसौकार्यासाठी एकत्रच घेतल्या आहेत. या नं. ११ व नं. १२ सवैयामध्ये युगल लीलाधारी कृष्ण-राधेच्या यमुनेच्या काठच्या लीला (विरह व संयोगातील) या धोबीणीने पाहिल्या म्हणून तिच्याच काठच्या शब्दांत त्या

तिने राधेला दूती (कृष्णाची म्हणून कळविल्या आहेत.)

## १२. पुन्हा तीच धोबीण

**मइलो करि डारत पीत पटे। घर जान न पैये बुलावनो धावत।।**
**लालह मैलो व्है जात सहा। अरि बारही बार सनेह लगावत।।**
**औरनसों वह लीजे धुवाय। हमें 'नृप शंभू' जू धोय न आवत।।**
**नूं कलयावति सांवरे रंगनि। सावरो रंग नही कल पावत।।१२।।**

**अर्थ :** त्याने आपला कपडा (वस्त्र नेसूचे) मळवला व ते (घाट) घरच आहे असे समजून पायीच बोलवण्यासाठी धावला. लाल श्रीकृष्णांनी वस्त्र मलीन केले जात असताना ते सहन केले (चिखल लागण्याचे) पण वारंवार स्नेह (प्रेम) मात्र करून घेतला. नृपशंभू या वेळी(बहारीचे) वर्णन करतात की, दुसऱ्यांकडून तो ते धुवून घे माझ्याकडून तो धुतला जाणार नाही.(धोबीणीस तो राधेला धुण्यास लावण्याचा संकेत). तू तो चुन्याच्या सफेद रंगात (तुझ्या शुभ्रकांतीने) तो सावळा (काळा) रंग मिसळावयास सावळा रंग (कृष्ण त्याशिवाय चांगला (सुंदर) धुतला जाणार नाही.(नायक-नायिकेच्या मीलनाचा या विशिष्ट प्रकारच्या खास यमुनातीरीच्या दूतीकडून संकेत)

## १३. संन्यासिनी दूती सवैया

**कान्हको चेली ब्रनाईको 'शंभु'। गई वृषभान कें भौन गुसाइनि।।**
**देखन कों जुरी आइ सषैतिय। डारि सहेलिनि राधिका पाइनि।।**
**अंक लगाई विभूती दई पुनि। सो कहिकें चित चौगुनो चाइनि।।**
**याहि इकंत लै मंत्र जपै यह। होय सबै ब्रजकी ठकुराइनि।।१३।।**

**अर्थ :** श्रीकृष्णाची दासी संन्यासिनीचा वेशविन्यास व बहाणा करून राधेच्या वडिलांच्या भवनामध्ये गेली. खरे तर तिला श्रीकृष्णालाही चकित करायचे होते. असे श्री शंभु कवी लिहितात. संन्यासिनी दूतीने (थंडी ताप आल्याचा बहाणा करून व थरकाप करून (शरीराचा) राधेच्या पायाशी पडल्याचे (सोंग) निमित्त केले. तिलाच (राधेला) मांडीवर घेऊन विभूति (भस्म) दिली व काही म्हणून (मंत्र पुटपुटून) तिचे चित्त चौपट खूश केले. तिने तिला काही जपण्याचा मंत्र दिला. (श्रीकृष्णाचे नाव) आणि हे ब्रजभूमीच्या राणी (ब्रज की ठकुराईन) राधिकादेवी तुझ्या मनाप्रमाणे सर्व घडून येईल हे

सांगितले.

### १४. मालिन दूती

**फूलन कों विनवो डहराइकें। ल्याइकैं दूती मिलाई दई ।।**
**नँदलाल निहारी निहाल भये। छबि कुंदन मालसी बालनई ।।**
**करतें छुटी भागि हरि पग व्है। बलि पैं चली कछू चातुरई ।।**
**हरि हरे न पावत भावती 'शंभु'। कुसुंभ के खेत हिराइ गई ।।१४ ।।**

**अर्थ :** या छंदात दूती म्हणून माळीण स्त्री असल्याने तिच्या व्यवसायास पोषक अशी वातावरणनिर्मिती आपणास मिळते. फुलांना टाकून येथे दूतीबरोबर संवाद प्रगट झाला फुलांना दूर करून ती माळीण दूतीस भेटण्यास निघाली. मध्यंतरी (रस्त्यातच) नंदलाल श्रीकृष्णजी भेटल्यामुळे ती त्यांना पाहून खूश झाली. त्यावेळी तिची कांती कुंदफुलांच्या माळेसारखी दिसू लागली; पण हरीच्या हातातून सुटून ती चातुर्याने काहीशी चालू लागली. कवी शंभूराज म्हणतात की, ती कृष्णाला हार जात नाही.(आटोपत नाही) ती शेजारच्या केसरच्या शेतात दडून बसली.

### १५. नाइन दूती

**राधिका के परवाल सें हाथन। लाल हरी घिरी लालि लुनाइ ।।**
**देखत ही बनी आपत कान्ह कहा। करिये 'कवि शंभु' बढाई ।।**
**लालि लसै अंगुरीन के बीच। तहाँ नख चंदन की छबि छाई ।।**
**कोपन की अहनाई में आनि मिलि। मनो बीचहि बीच जुन्हाई ।। १५ ।।**

**अर्थ :** राधिकेच्या प्रवाळासारख्या हातात (लाल) श्रीलाल श्रीकृष्ण यांची सुंदरता वेढली गेली. कविराज शंभू म्हणतात की, तिला पाहताच तिची प्रशंसा (मोठेपण) केली गेली. ती सुंदरता बोटांच्या नखामध्ये जणू चंदनाप्रमाणे सुगंध व सौंदर्य कोपराच्या आरशामध्ये एकत्र झाल्या. जणूकाय मधून मधून चांदण्यांच्या चमचमण्याचा भास होत होता. येथे राधेच्या सुंदर हाताच्या आरशात लाल श्रीकृष्णांचे प्रतिबिंब व आपल्या हातातील (कोपराजवळ) आरशात या दोघांचे चांदणे (चंद्र व चांदणे) एकत्र होत होते.

## १६. मध्या नायिका

देखा चहे पियको मुख पैं। अँखियान करै जियकी अभिलासी ।।
चाहति 'शंभु' कहे मन में बतियाँ। मुखमें पुनि जाति न भारवी ।।
भेटबोंकों फरक भुजणे नहि। जीभते जाई नहीं नहि मारजा ।।
लाज औ कामे दुहून बहू बलि। आज दुराज प्रजा करि राखी ।। १६ ।।

अर्थ : येथे (मध्या या प्रथम रजोस्रवाचे वर्णन मिळते. नायिका प्रियकराच्या (मुखाची-मुख पाहण्याची) अपेक्षा करीत आहे. आपल्या नेत्रांनीच ती ही इच्छा (अभिलाषा) प्रगट करीत आहे. कविवर शंभू म्हणतात की, मनातल्या मनातच ती काही बोलत आहे, पण तोंडातून त्या प्रगट होत नाहीत. भेटीसाठी तिचे बाहू स्फुरण पावत आहेत, पण वाणीने मात्र ती नाही नाही असे म्हणत आहे. लज्जा आणि कामदेव यांच्यामध्ये ती सापडली आहे. एकाच देशात दोन राजे राज्य करीत असल्यासारखी तिची अवस्था झाली आहे. परकाया प्रवेशाची व सूक्ष्ममनोभाव शक्तीमुळे हे वर्णन कवीस शक्य झाले असावे.

## १७. प्रौढा

सांझहिते रतिकी गति जेतिकै। कोक कें आसन जे गिरा गावाति ।।
वारिज नैननि बारहि वारन। चूमिवेंको मिसू ओठ छपावति ।।
केलि कला के तरंगिनीसों हठि। मोहन लाल के ज्यों ललचावती ।।
अंक मे बीति गई रतियां पैं। तऊ छतियां तिये छाहिन भावति ।। १७ ।।

अर्थ : प्रौढ अशा पूर्ण युवतीचे वर्णन आपणास या छंदात मिळते. सायंकाळच्या वेळी रतिदेवींच्या हालचालींना जिंकून ती कोकशास्त्रातील आसनांचे वाणीने गान करीत आहे. (शृंगारिक गाणी गात आहे.) त्यावेळी तिच्या डोळ्यांतून पाणीही वाहात आहे. प्रियाच्या ओष्ठाधरास स्पर्श करण्याची इच्छा झाल्याने ती आपले ओठ ही लपवत आहे. केली (शृंगार) कलेमध्ये मनमौजीपणात हट्ट करून मोहन लालांची (श्रीकृष्ण) लालसा धरीत आहे. अंकावर सगळी रात्र घालविली तरीही तिने आपल्या वक्षस्थळास मुक्त केले नाही (अंक -मांडी) प्रौढेच्या पूर्ण रतिलीलेचे वर्णन आपणास येथे मिळते. पूर्वानुभवाचा स्पष्ट उद्देश नसला तरी शरीरभाषेत तो व्यक्त होत आहे.

## १८. विपरीत रति

**रीति तजी विपरीत सजी। रसना वजी मंजूळ अंक के रासतें।।**
**दो उर बीच उरोज दबे 'नृपशंभू'। बचे है अनंगके सासतें।।**
**चपि कपोल दुहू करसों मुख। चूमति प्यारि आनंदित होंसतें।**
**वैर तजे अरविंद पिये मकरंद। मनो अरविंद के कोशतें।। १८।।**

**अर्थ :** येथे पुरुषायित कृतीद्वारे, नायिकेच्या विपरीत रतिक्रीडेचे वर्णन मिळते. नेहमीच रतिप्रणाली सोडून नायिका जिव्हेच्या अनुरक्त भावाने स्वतःस झोकून देऊन क्रीडा करीत आहे. त्यावेळी आपले दोन्ही उरोज (स्तनद्वय) दोघांच्या छातीवर दाबत आहे. नृपशंभू या (नाजूक) प्रसंगी लिहितात की, अनंगदेवाच्या श्वासोच्छ्वासामुळे त्यांचे अस्तित्व टिकून आहे.(इतके ते दबावाखाली आहेत.) गालही दाबून दोन्ही हाताने मुखांचे चुंबन ती प्रिय नायिका आंनदीत होऊन घेत आहे. त्यावेळी सारस पक्षी आपले वैर सोडून कमळाच्या पुष्परसाचे कमल कोशातून मधुपान करीत आहेत.

## १९. मुग्धा ज्ञातयौवना

**काननसों उमडी अँखियां मुख। दीपति पुंज नयो उनयो है।।**
**रोजहि रोज उरोज वहे अरु। रोमलता थल आंनि दयो है।।**
**को यह भार चलायहे धौ। 'कवि शंभु' यहे चित्त शोच भयो है।।**
**आवत बैस नई दुलही इहि। शोचसों लंक विलार गयो है। १९।।**

**अर्थ :** नव्या दुलहीनीचे(नायिकेचे) नवयौवन रूप जे तिने स्वतःही जाणले आहे. अशा ज्ञातयौवना नायिकेचे वर्णन या १९ व्या सवैयामध्ये आपणास मिळते. मुग्धा व ज्ञातयौवना अशा दोन धारणांची ही नायिका आहे. मुग्धा नवयौवनसंपन्न असते तर ज्ञातयौवना ही जाणकार युवती असते. चढत्या क्रमाने या सवैया आपणास शृंगाररसाची जाण करून देतात. या सवयैमध्ये मुखकमलावर नेत्र कानापर्यंत पसरलेले आहेत. त्यामुळे ते द्विजद्वय झुकलेले आहेत असा भास होत आहे. प्रत्येक दिवशी उरोज भरून ओसांडत आहे व रोमांचित स्थान पुन्हा निर्माण होते अथवा हे ओझे किती वहन करायचे (असे कविशंभू लिहितात) असा चित्तामध्ये विचार (काळजी) केला जातो. या नववधूमध्ये या काळजीने (विचार चिंतेने) कमर (मध्यकटी) विलयास गेली आहे. (ती कृशकटि झाली आहे.)

## २०. मुग्धा स्वाधीनपतिका

**तनको तनको उधरे पद औचक। 'शंभू' कसु पडयो पावतसे ॥**
**दिनमेंह लगेह पगेह रहे। सब रैन कुहीसी जगावतसें ॥**
**यह लाडिली लाज न जात गही पैं। रह अँखियान गडावतसें ॥**
**बलि गौनो ले आये लला जबतें। तबतें रहे सोनो गढावतसे ॥२०॥**

**अर्थ :** मुग्धा (नवयौवनसंपन्ना) व पतीला आपल्या काबूत ठेवणाऱ्या (वश) नायिकेचे वर्णन आपणास मिळते.

शरीरावर वस्त्र ओढून व पसरवून अचानक कसून (आवळून) बांधून ती पडून राहिली. दिवसा पायाला मेहंदी लावून रात्री ससाणा पक्ष्याप्रमाणे जागी राहते. त्या लाडिकास सारखे डोळे वटारण्यात (स्नेहाने) काही संकोच (लज्जा) ही वाटत नाही. ती द्विरागमनासाठी नेण्यास आलेल्या प्रियकराच्यासाठी जणू सुवर्णलंकार बनवण्याचे (सारखे) काम करीत आहे.

## २१. मध्याकी रति

**पढई समुझार सहे सिनियों। कोड मारके में मिलती न कहा ॥**
**पलिका परलै उरलाइ लली। लपटाति में 'शभू' लजाति महा ॥**
**घुघुरून को शोर सुने सकुचे पिय। होत ज्यों ज्यों अति लाल जहां ॥**
**तिय त्यों त्यों तिरीछि करै अँखियाँ। अनखाति महा अरुजाति हहा ॥२१॥**

**अर्थ :** येथेही मध्या (प्रथम रजोवतीस) च्या रतिक्रीडेचे वर्णन आपणास मिळते. क्र. १६ व्या छंदात मध्याचे वर्णन मिळते. पण प्रारंभ व अनुभवानंतरच्या क्रीडेचे दोन्ही छंदात आढळते.

शिकवून समजावून समवयस्कांनी दिलेली सूचना ती पाळणार की नाही? पलंगावर दुसऱ्या बाजूस कूस करून लाडकीने (राधेने) खूप लाजून आलिंगन दिले, असे कवी शंभू म्हणतात. त्यावेळी पायाच्या घुंगरांचा (पैंजणाचा) आवाज ऐकून प्रियकराच्या (श्रीकृष्ण) संकोच वाटला. यामुळे त्या त्या वेळी (आवाजाच्या) त्या त्या अनुराग (लालरंग) वाढला. त्यावेळी नायिकेने तिरपे कटाक्ष करून क्रोध दर्शवित अधिकच प्रश्न निर्माण करीत आनंद व्यक्त केला.

## २२. उपपति नायक कवित्त

ओझल अलीनकै खडीहि न्हाय बगर।
अचानकही 'नृपशंभु' देखि तहां फसिंगो ।।
लटनसो लटकि लपटि झटपट कौन।
फूलनतें खसि भुजमूलनमैं बसिगो ।।
कौल पंखरीनसी सुरंग अंगुरीनतें।
सलौनीकी सरस लौनी गांठ देत गसिगो ।।
कसनीकी लीककी लुनाइमें लबढि मन।
कंचुकी के कसन तनीके तेरे कसिगो ।। २२ ।।

**अर्थ :** नायिकाभेद प्रकारातील एक वेगळ्याच प्रकारचे कवित्व आपणास येथे भेटते. नायिका, पतीशिवाय उपपतीची मीलनप्रसंगी परकिया नायिकेचा हा व्यत्यास आहे. आंघोळ करण्याच्या आधीच (शिवाय) ती संकुचित होऊन थोडी दृष्टिआड झाली तोच नृपशंभू म्हणतात, ती तेथेचे फसवली गेली. केसासी झटापट करून तिच्याशी झटापट कोणी केली? कुसुमित होऊन (आनंदी) ती नायकाच्या बाहुपाशात बसली गेली. त्यावेळी कमळाच्या पाकळीसारखा (कमलपुष्पाची पंखुडी) तिच्या अंगुलिका (बोटे) चमकल्या त्यावेळी सरस नायिकेची आकर्षक गाठ (भेट) देऊन तिचे अपहरण (वस्त्र) केले. त्याचवेळी अंगियाच्या दोरीच्या (ओढणी) काढ-घालीमध्ये मन घोटाळले. मग कंचुकीला थोडे तागून बांधण्याचा प्रयत्न झाला. हे अन्य छंदापेक्षा अलग स्वच्छंदी विहाराचे कवित्व आहे.

## २३. मुग्धा अज्ञात यौवन

अंगराग जान तीन सखीन के पट रंगे।
केसरी के भ्रमनि पखारे सारी सेंति है ।।
अधर खटाई लै घसति क्यों ललाई जाई।
अहहा सुभावही कब धौ, यह चेति है ।।
नैन प्रतिबिंब परे, अरसी महालमधि।
शंभुराज द्वारनि कपाट दै दै लेति है ।।
खंजरीट जानि दौरी दौरी गहे आनि जब।
मूठीपरै झूठी, तब छोडी छोडी देति है ।। २३ ।।

**अर्थ :** येथे आपल्या तारुण्याचे ज्ञान नसलेल्या मुग्धा नायिकेचे वर्णन आपल्या शंभूराजे कवींनी केले आहे. क्र. १९ छंदाच्या काहीसी निराळी स्थिती येथे मुग्धा नायिकेची आहे. यौवनप्रभाव जाणून तिने सखीचे वस्त्र रंगविले. पिवळ्या भ्रमाने ती साडीला धुऊ लागली. पण या घासण्याने ओठावरचा आंबटपणा (काली) कसा जाणार? अहाहा, हा स्वभाव व मन घासून का जाणार? डोळ्यांच्या आरसे महालात तिचे प्रतिबिंब पडले. शंभूराजे म्हणतात, ती हे द्वार (डोळ्यांचे) उघडू लागली. त्यावेळी हे खंजनपक्षी दौडत आले त्यावेळी मुठीत आलेला नकली केससमूह ती सोडून देते.

## २४. प्रोषितपतिका

**आहिकें कराहि कांपि क्रशतन बैठि आई।**
**चाहत संदेशों कछु कह्यो पैं न कही जाय॥**
**फेरि मसि भाजन मंगार लिखिवेकों कछु।**
**चाहे हाथ कलम गहत पै न गही जाय॥**
**रोतें पैं उमंडि असुंवान को प्रवाह बह्यो।**
**चाहे 'शंभु' थाह लहिवें को पैं न लही जाय॥**
**दही जाय गात, वात बूझें तें न कही जाय।**
**वहि जाय कागइ कलम हाथ रही जाय॥२४॥**

**अर्थ :** येथे प्रोषितभर्तृका अर्थात जिचा पती दूर गेलेला आहे अशा नायिकेचे वर्णन आपणास मिळते. हाय हाय किंवा आहा असे आश्चर्यचकित होत्साति, कृशतन नायिका बसण्यासाठी (विश्रांती) आली तर काही संदेश कुणालातरी देण्यासाठी इच्छुक होती; परंतु ती तो देऊ शकली नाही. नंतर ती शाईची दौत मागवून काही लिहिण्यासाठी व हातात लेखणी घेऊन काही लिहू इच्छित होती. पण ते झाले नाही.(लेखणी घेऊ शकली नाही) त्यावेळी रडून रडून अश्रूंचा प्रवाह वाहता झाला. शंभू कविराज म्हणतात, ती काही लिहिणे(थाह) योजित होती; परंतु ते तिला घेता आले नाही. त्यावेळी दग्ध गात्रांची कथा तिला सांगता आली नाही. त्यावेळी कागद निसटून गेला व लेखणी हातातल्या हातातच राहिली.

रीतिकालीन सुख्यात कवी बिहारीलाल यांची याच आशयाचा दोहा बिहारी सतसईमध्ये आपणास मिळतो.

### २५. छवि कवित्त

**आजु जलकेलिमें विलोकी, वृषभानसुता।**
**तनदति झलकति काशमीरी पीशीसी ॥**
**विहसत दांतनकी पांति चमकति मनो।**
**हीरव कनीन की लगार राखी मीसीसी ॥**
**'संभुराज' बारबार धारसी लगति एक।**
**जमुनामे श्याम नदी जुदी मिली दिशीसी ॥**
**सिंधु निकसीसी स्याम उरमें बसीसी शीशी ॥**
**जाके मुखशीशी ढरकति सुधाशीशीसी ॥ २५ ॥**

**अर्थ :** कवित्त छंदात राधेची जलक्रीडेची लीला वर्णित केले आहे. आज वृषभानूंच्या कन्येस (राधा) जलक्रीडा करताना पाहण्यात आले. त्यावेळी काश्मिरी समोद गव्हासारखी तिची कांती शोभत आहे. हसणाऱ्या दंतपंक्ती हिऱ्याच्या तुकड्यासारख्या चमकत आहेत. प्रेमाने जणू काही त्या हिरकणीच जोडल्या आहेत असे वाटते. संभुराजे कवी म्हणतात, त्या सगळ्यांच्या समूहात तो एकच चमकणारा हीरक प्रवाह आहे असे वाटते. काळ्या यमुना नदीला (श्रीकृष्णांना) दुसरी चमकदार नदी (राधारूपी गंगा) दुसऱ्या दिशेने मिळण्यास जणू आली आहे. श्रीकृष्णांच्या अंत:करणात सागरातील (सिंधु) ती जणू एक काचेचा आरसा आहे. त्यांच्या मुखदर्पणात (राधेच्या) अमृताच्या कृषीचे पडलेले रूप पाहावे, असे वाटत असते. राधेच्या रूपसौंदर्याबरोबर श्रीकृष्णजींचेही दन्तसौंदर्य या युगुलप्रेमींच्या रूपाने शंभू कवींनी एकमेकांबरोबर वर्णिले आहे.

### २६. प्रौढा के विपरीत रती

**जीति रति कामहि करति रस रीति जहां।**
**प्रीतमतें दुहु रचि विपरीत रति है ॥**
**मची शिशिकार रसनाकी झनकार सही।**
**'शंभु' मुखचंद्रमा की छबि छलकति है ॥**

कटि लफि लफि लचकंति कचभारनतें।
हारनतें औरे उर ओध उलहतिं है ।।
पीठिपर बेनी मृगनैनीकी लुरतिमानों।
नागिन सुमेरकी शिलापें लहरति है ।।२६ ।।

**अर्थ :** येथे क्र. १८ च्या कवित्तशी याच पद्धतीच्या विपरीतरतीचा एका प्रौढा (परिपक्व नायिका) चा पुरषायित पद्धतीच्या लीलेचे वर्णन मिळते. जणू काही अनंगदेवाच्या रतिलाही जिंकणारी अशी ती रसरीति करू लागली. प्रियकराशी दोघांना विपरीतरतीची लीला आरंभिली. त्यावेळी जिव्हेने शीत्काराचे झंकार-हुंकार निघू लागले. कवी शंभू म्हणतात, त्यावेळी तिच्या मुखचंद्रमाचे सौंदर्य अधिकच उठून ओसंडून वाहू लागले. कमर वरखाली लचकल्यामुळे व तिच्याबरोबरच्या कच (केशकलाप) भाराच्या व हाराने वक्षस्थलावरील प्रवाहाबाबत तक्रार (खोटी पण गोड) करीत आहे. पृष्ठभागावरील (पाठीवरील) वेणी या मृगनयनी (हरिणाक्षी) नायिकेची झुलत आहे. त्यावेळी सुमेरूच्या शिळेवर नागीण सळसळत आहे असे वाटते. (डोक्यावरून निघालेली व पाठीवरील झुकलेल्या, सळसळणाऱ्या वेणीबद्दल)

## २७. रूपगर्विता

आनु हों गईती 'शंभु'त्यो ते नंदगांव तहां।
सांसती बडी है रुपवती वनितानकी ।।
घेरि लियो तियन, तमासो करि मोहि लखै।
गहि गहि गुल्फलुनार तखानकी ।।
रोके कस बोलि बोलि औरन दिखावें रीझि।
रीझि कुबराई अरुनाई मेरे पानकी ।।
घुंघट उधारी ऐके मुख देखि देखि रहै।
रोके लगि नापन बडाई अँखियानकी ।।२७ ।।

**अर्थ :** येथे रूपगर्विता राधेचे बहारदार वर्णन कवीने केले आहे. रूपगर्विता ही नायिका आपल्या रूपसौंदर्याबरोबर अभिमान व गर्व असलेली असते. तशी ती येथे शंभू कवींनी वर्णिली आहे. (श्रीकृष्ण) नायक जेव्हा नंदगावास गेला (राधेच्या गावास) तेव्हा ती वनितामधील (स्त्रियांच्या घोळक्यातील) मोठी रूपवती (वक्ष) नीट पाहू लागली. स्त्रियांनी ती वेढली गेली होती. मला

पाहून ती खेळू (बहाना) लागली. टाचेवरील नडघीची गांठ सुतार काटतो (कापतो) (तसा खेळ) तसे करू लागली. सहाय्यकांना (सहेलींना) थांबवून दुसऱ्यांना खूप बोलत बोलत आपली खुशी प्रगट करीत होती. आपल्या तांबुलाचे लालपण (रंगत) कुबरीची (दासी) नक्कल करून आनंदीत होत होती. घुंघट (पडदा) उघडून एकेकीचे मुखावलोकन करीत होती. त्यावेळी आपल्या डोळ्यांचे मोठेपण कमी करीत होती. खुशी डोळे मिटवून आपले दीर्घ डोळे झाकीत होती.(आनंद व खुशी प्रकट करण्याचा सान नयन शांत भाव).

## २८. प्रौढा के सुरतांत. कवित्त

**(कवी कलशकृत–कवी कलश)**
**अंग अरसोहै छबि अधरन सौहेंचढी।**
**आलसकी भौंहे आभारति रोजकी ।।**
**'सुकवि कलश' तैसे लोचने पगे है नेह।**
**जिन में निकाई अरुनोदय सरोजकी ।।**
**आछी छबि छाकि मंद मुसकान लागी।**
**विचल विलोकी तन भूषणके फौजकी ।।**
**राजै रदमंडली तन कपोल मंडली में मानौं।**
**रूपके खजानेपर मोहर मनोजकी ।। २८ ।।**

**शब्दार्थ :** सौह–शपथ,(क्रि.वि.) सामने। आलस की भौहं= आळसावलेल्या भुवया। रदमंडली = दंतपंक्ती। मनोज = कामदेव अनंग। निकाई = समूह,घर। छाना–आच्छादित करणे, पसरवणे। विचल = अस्थिर। अर = और। सौंह = शपथ, सामने(क्रि.वि.)। सोहै = शोभणे। मुहर–शिक्का। सुरतात=सुरत क्रियेनंतर (संभोगानंतर)

(छत्रपती संभाजीराजांच्या बरोबरीनेच काटले गेलेले, अमर कविराज) शरीर आणि त्याच्या समोरील प्रौढेच्या अंगकांतीची शोभा ओठांच्यामुळे आणखी वाढली आहे व आळसावलेल्या भुवयांना जीत आणखीही कांती नेहमीच्या क्रीडेमुळे (रोजच्या) वाढली आहे. सुकवी कलश म्हणतात की, तिच्या डोळ्यांपुढे ही स्नेह (लोभ) वाढत आहे. त्यांच्यात अरुणोदयांच्या व कमलकांतीच्या समूहाची कांती (शोभा) लाभली आहे. त्या सुंदर सौंदर्याबरोबर

मंद मंद हलके हास्यही फार छान लागत आहे. शरीरावरील अलंकाराचा संभार अस्थिर (हालचाल) होत आहे. दोन्ही गालावरच्या दंतपंक्तींची शोभा जणू सौंदर्याच्या खजिन्याबरोबर अनंगदेवाची (कामदेव) मोहर (शिक्का) लागली आहे अशी दिसत आहे. अनंगदेव ध्वन्यर्थाने श्रीकृष्ण व रूपखजिना राधाजी यांचा आहे. ही अप्रतिम मालोपमा आपणास शंभूराजांचे काव्यगुरू अंतरंग मित्र कलशांची एक झलक आहे.



परिशिष्ट :

**१. गोरे करेरे तरेरे उरोजन दै कर लागे लला झुकी झुमन।**
हे नृपशंभूकृत 'नायिकाभेद'मधील एक पंक्ती डॉ. दिवाकरांना आपणाकडील २७ छंदांच्या शिवाय प्राप्त झाली.(माधुरी पत्रिका जून १९४१ वरून) जिज्ञासूंना सदर पद पूर्ण मिळाल्यास अवश्य संपादकांकडे पाठवावे. त्याचा साभार स्वीकार व उल्लेख पुढील आवृत्तीत करू.

**२. तीर कालिंदीके हौ उत 'शंभु'। सुखावतही पट धोय बगारयो।।**
पदाच्या अर्थावरून, ही शंभूराजांची रचना वाटत नाही. तरीही मान्याधार ग्रंथात ती मिळाल्याने तिचा सार्थ अंतर्भाव वाचकांच्या जिज्ञासातृप्तीसाठी केला आहे.

**३.कान्हको चेली बनाईको 'शंभु'। गई वृषभानकै भौन गुसाइनि।।**
ही उत्तरकालीन लेखनिकाचाच संपूर्ण संदर्भ असलेला दोहा आहे. पण त्याच्याच कृपेने वरील १२ पदे मिळाल्याने कृतज्ञतापूर्वक त्याचा उल्लेख संपादकास करावा वाटला.

४. कवी कलशांचेच क्र.२८ नंबरला असलेले 'नायिकाभेद' विभागातील पद '**अंग अरसोहै छबि अधरन सौहेंचढी।**' या पदाचा अंतर्भाव 'नखशिखमधील' संयुक्त रूपवर्णनाबरोबर नायिकाभेद मध्येच 'प्रौढा के सुरतांत रति' कवित्तमध्ये एका अभ्यासक (वि. ना. कोठीवाले) यांनी केला आहे. तोही उचित वाटल्याने त्या प्रारंभिक भागात 'नायिकाभेद' पदसंभारात मला करणे उचित वाटले.

५. नायिकाभेद पदामधील नृपशंभू विशेषणाचा वापर पाच वेळा झाला आहे. त्यामुळे त्या संधिकाळातील (युवराज व छत्रपती) ही रचना असल्याचा (शंभू व नृपशंभू) तर्क युक्तिसंगत वाटतो. नृपशंभूचा शासनकाल १६८१ ते १६८९ असल्याने त्या काळातील (फावल्यावेळेची) रचना असावी, असेही अनुमान डॉ. कृष्णा दिवाकर यांनी काढले आहे.

सगळीकडेच रूपाबद्दल कवींची विशेष तीव्र आसक्ती असल्याचे आढळते. मानसशास्त्रानुसार प्रेमाचा मूलाधारही रूपासक्तीच आहे. नायिका होण्यासाठी पहिली अट सुंदर असणे आहे.

**मानो रची छबी सुरति मोहिनी। श्रीधर ऐसी बखानत नायिका।**
याप्रमाणेच 'दास' अभ्यासकाने नायिकेची काही लक्षणे व काही गुण सांगितले

आहेत.

**सुंदरता, बरननु, तरुनि, सुमति नायिका सोइ।**
**सोभा, कांति, सुदीप्ति, जुत, बरनत हे सब कोई ।।**

अर्थात, (नायिकेचे सौंदर्य, तरुणपणावर शोभा, कांती आणि दीप्ती (तेज) यांनी ती संयुक्त असली पाहिजे. हे नायिकेचे सहज गुण होत. याशिवायही आणखी दोन अंगे तिच्यात हवीत. १) अलंकारिक रूपवर्णन २) इंद्रियोत्तेजक रूपवर्णन (हिंदी साहित्याचा बृहत् इतिहास भाग ६ वरून. संपा. डॉ. नगेंद्र)



## पदानुक्रमणिका (नखशिख)

# नखशिख

**नखशिखची पूर्वपीठिका व शंभुराजांचे हे नखशिख वर्णन**

भारतीय साहित्यात संस्कृतातील 'नखशिख' जगत्‌विख्यात झाले आहे. पण त्याहीपूर्वी प्राकृतातही ते फार प्रभावीपणे व्यक्त झाले आहे. स्वत: संस्कृत चूडामणि (कवी बाणभट्ट यांनी) गुणाढ्य, प्रवरसेन (वासवदत्त) कवींची (प्राकृतांची) हर्षचरितात सार्थ स्तुती केली आहे.

हिंदी भाषेतील ब्रजभाषेतील बहुतेक साऱ्या कवींनी हा नखशिख प्रकार मनोभावे हाताळला आहे. छत्रपती शंभूराजांच्या 'नायिका-भेद' व 'नखशिख' या ग्रंथांवर हटकून या ब्रजबोलीचा प्रभाव दिसतो. नष-शिष, सौंह (शपथ), रांजै (शोभा देत) लसत (शोभा देते) कौंहर (कमल) इ. अनेक थेट ब्रजबोलीचे शब्द आपणास मिळतातच, पण कवी बिहारीलाल यांचे श्रीकृष्णाचेही नखशिख सदृश्य वर्णन आपल्यासमोर येते. श्रीराधिकाजींचे

**मेरी भवबाधा हरो, राधा-नागरी सोई।**
**जा तनकी झाँई परत, श्याम हरितदुति होई।।**

हे वर्णन येतेच, पण युगलकाव्यसाथी कन्हैयाजींचे

**"मोर-मुकुट कटि काँछनी, कर मुरली उरमाल।**
**यह बानक मो मन बसो, सदा बिहारीलाल।।"**

हे नखशिखाभिमुख अल्पाक्षर हुबेहूब वर्णनाचेही हटकून स्मरण होते. 'धागेसे पता चलता है कि तागा किसका है' या म्हणीनुसार अस्सल ब्रजभाषेचे महीन रेशमी वस्त्र शंभूराजे वाचकास सादर करतात. संस्कृतात तर लक्षणासाठी पुढील अवयवांच्या वैशिष्ट्यांचा(नायिकेच्या) उल्लेख आढळतो.

रंग, डोळे, भुवया, केस, नाक, कान, मान, बांधा, वक्ष, उंची, पाय, हनुवटी, गाल, खळी, ओठ, जीभ, लांबसडक बोटे, नितंब, कंबर, ओटीपोट, खांदे, कपाळ, पापण्या, मांड्या, पाऊल, चवडा, टाच, पायाची बोटे, पोटऱ्या, हाताचे कोपर, अजानुबाहू, कंठमणी (कंठ) (ॲडम्स ॲपल Adam's apple) यातील सगळ्यांचा मागोवा शंभूराजांनी आपल्या नखशिखामध्ये घेतला. बहुतेक नागरी प्रचारिणी सभा, काशीची प्रत उपलब्ध होताच वाचकांना ती लवकरात लवकर उपलब्ध (मराठीत) केली जाईल. सध्या दुधाची तहान उपलब्ध दहा पदावर भागवावी.

'बुधभूषण'मध्येही आपणास भवानीस्तुति प्रसंगात संस्कृतातील बरेचसे नखशिख आपणांस उपलब्ध आहे. कुतूहल म्हणून या संदर्भात आपणास ते पाहता येईल. जिज्ञासू वाचकांसाठी परिशिष्टात ते अर्थासह मुद्दाम दिले आहे. हिंदी तीन ग्रंथांतील 'नखशिख'ही मध्यंतरीची रचना आहे. (नायिकाभेद नंतरची). भाषेच्या प्रौढतेवरून हे अनुमान निघते. हिंदीमधील देव, मतिराम, पद्माकर इ. रीतिकालीन कवीप्रमाणेच शंभूराजांच्या कवितेची रचना आहे. त्यांच्या या तीन ग्रंथांचा निर्देश हिंदी साहित्याचा बृहत् इतिहास खंड ६ मध्ये डॉ. नगेंद्र यांनीही केला आहे. उदाहरणादाखल त्यांनी दिलेल्या पदामधील लालित्य आपणास खचितच आपल्या सदरच्या पुस्तकात पाहावयास मिळेल. कालौघात टिकलेले हे काव्य असल्यानेही त्याचे महत्त्व आहे.

संस्कृताचे अजीर्ण झाल्यावर (बुधभूषणमुळे) शंभूराजे प्राकृताकडे वळले असावेत. **"काम जो आवै कामरी। का ले करे कमाच"** (जर साध्या कांबळी (घोंगडी) ने काम भागत असेल तर रेशमी वस्त्राची काय गरज?) ही संत तुलसीदासाप्रमाणे त्यांची ही धारणा झाली असावी. वाचकांना किंग्ज इंग्लिश (राजाची इंग्रजी भाषा) प्रमाणे राजाची हिंदी-संस्कृत अनुभवण्यास मिळते. मराठी यांचे अहोभाग्य प्रस्तुत दोन्ही ग्रंथ विठ्ठल नारायण कोठीवाले यांच्या (छ. संभाजी) संगीत छेडलेला छावा या गद्य-पद्य नाटकाच्या दीर्घ (पृ.१२८) प्रस्तावनेनंतर -

A few selections from Sambhaji's two Hindi poems (नायिकाभेद) 1. Nayika Bhed & 2. Nakha Shikha (नखशिख) दिलेल्या २७ पदे (१) व ३ (२) पदसंख्येवरून घेतल्या आहेत. शिवाय डॉ. कृष्ण दिवाकर यांचे "भोंसला दरबार के हिंदी कवी" हा ग्रंथ तीनही ग्रंथांसाठी उपयोगी पडला. मधुमक्षिका व्रतानुसार हे येथपर्यंत येऊन ठेपले. बृहत् इतिहासामध्येही 'वेणी'बद्दलचे पद मिळाले.

### १. श्री गणजूलिखिते संभूकृत नखशिख।

पद पद्म पत्र सम चरन जंघ जिमी कनक कर मकर॥
नाभी ललित गभीर, उदर लंबित विसाल वर।
उर दीरघ अति मंजु चारि कर, देत चारि फल॥
एक दंत अरु सुंड लषत, हरि जात सकल मल।

**अति नैन चारु ढाली फलक श्रवन सीस छविसों मढत ।।**
**ग्यान होत अग्यान के सो गननायक गुन पढत ।।१ ।।**

गुणगायक श्री गणेशाचे श्री शंभूराजेकृत नखशिख वर्णन (या सवैयामध्ये श्री गणेशजींचे नखशिख वर्णन आढळते) ही वंदनात्मक सवैया आहे. श्रीराधिकाजींचे नखशिख वर्णन करण्यापूर्वी विघ्नहरांची ही विषयानुकूल वंदनाही यथोचित वाटते.

श्रीगणेशजींचे पाय, हे कमलपत्राप्रमाणे समचरण तर जांघ ही सोनेरी माशांची बनवलेली, नाभी प्रदेश (बेंबी भाग) हा लालित्यपूर्ण व खोल तर पोट लांब (म्हणूनच लंबोदर हे गणेशाचे प्रसिद्ध नाव) व फार मोठे वक्ष प्रदेश (छाती) अत्यंत विशाल, तर चारही हात सुंदर असून ते चारही फळे (धर्म, अर्थ, काम, मोक्ष) देतात. एक दात आणि सोंड ही शोभा देऊन सगळ्या पापांचे हरण करीत आहेत. डोळे अत्यंत सुंदर, कान हे अत्यंत मोकळे (ढिले) व शीर्ष सौंदर्याने नटवलेले असे आहे. यामुळे (दर्शनाने) अज्ञानी माणूसही गुणनायकांचे (गणेशजी) गुणगान गायल्याने (वारंवार केल्याने) ज्ञानी होतो.

**२. विधि प्यारी को ध्याइकै ।**

सरस्वती, भवानीदेवी यानंतरची व श्रीराधाजींच्या वंदनाचा दोहा पहा.

**विधि प्यारी को ध्याइकै, भव प्यारी सिर नाई।**
**हरि प्यारी के अंगसो, वरनो सकल बनाई ।।२ ।।**

श्री सरस्वती (विधिप्यारी) देवीचे स्मरण करून, भवानीमातेस (पार्वतीस) (शिव (भव) प्यारी) वंदन करून (पुढच्या तिसऱ्या इष्ट देवीकडे) हरीस प्रिय असणाऱ्या राधेपुढे मस्तक झुकवून तिच्या अंगप्रत्यंगांचे वर्णन करीत आहे.(दोनच पंक्तीत ३ देवींचे चपखलपणे केलेले भवानीदेवी व राधिकाश्रींचे हे मनोहारी दर्शन)

## ३. पग वर्णन सवैया

**कौहर कौल जपादल विद्रुम। का इतनीज बंधुकर्म कोति है ।।**
**रोचन रोरी रची मैहंदी। नृपशंभु कहे मुकता सम पोति है ।।**
**पाय धरैं ढरै इंगुरसो तिनमें। मनि पायलकी धनी जोति है ।।**

**हाथ व्हैं तीन लौ चारिह औरसो। चांदनी चूनरीके रंग होति है॥**

**शब्दार्थ :** कौहर = एक लाल फळ। कौल = कमळ। जपादल = अड्हल फल। विद्रुम = मूँगा(रत्न) (पोवळे)। बंधुक = दुपहरीयाचे फळ। कोति = दिशा। रोचन = शोभा। रोरि = कोलाहल। मुकतासम = मोत्यासारखे। पोती = पसरवणे, लेपणे। इंगुर = सिंदुर। चारिहूं = चहूकडून। चांदनी = चंद्रकांतीची। चुनरी = बुनकीदार ओढणी। औरसों = बाजूंनी **पायांचे वर्णन–छंद सवैया** (श्रीराधिकाजींचे) पाय हे लाल रंगाच्या (कौहर) फळासारखे, लाल रंगाच्याच कमळासारखे, जौ (अडहुल) पुष्पाप्रमाणे (पिवळे धमक), त्याचप्रमाणे पोवळ्या (लाल) सारखे दिसतात. जणू अनेक दिशांनी उमललेले दुपहरीयाचे फळच। आवडीच्या (शोभायमान) सखींच्या गोंधळात मेहंदी लागली आहे. शंभूनृप म्हणतात. जणू मोत्यांचा (चुरा) लेपच पायास लावला आहे. सिंदूरच जणू पायातून ओघळत आहे. नुपुरांची माळ (मणी माला) प्रकाश देत आहे. (खूप चमकत आहे) चारी बाजूंनी ती सहेलींनी (मैत्रिणींनी) घेरली गेली आहे. बुनकीदार ओढणी चमकदार चंद्रप्रभेने शोभायमान रंगाची दिसत आहे. हिंदी साहित्यातील सुख्यात कवी बिहारीलाल यांच्या दोह्याचे हटकून स्मरण येथे जाणकारास होईल.

## ४. रोडी वर्णन कवित्त

**राधिका रोडी कोऊ कौंहरसी कहे सोन।**
**मेरे चित्त दरगंध कहवाइ धर॥**
**शंभुराज कोऊ कोऊ लालसी नरपानै तेतो।**
**निपट निदानै वा कठौरता निघटवर॥**
**यह तो नरम नैन देखत सुधासो पियैं ।**
**चुपरि अतर जों निसावति सुगंध झर॥**
**रंजन मनाहि दुख भंजन सकल मनो।**
**सुमन गुलाबकों दब्यो है कंजफूल तर॥४॥**

**शब्दार्थ :** रोडी = टाच। कौंहर = कमल। सोन = सुवर्ण। दरगंध = सुवास (दरवळलेला सुगंध) धर = धारण केलेला। वरपान = खंड, मंजिल। निघटवर = कमी होणे। चुपरी = चोपडलेले। अतर = अत्तर। निसावित = संबंध, निकलना। झर = स्त्रवणे झरा। कंजफूल = ब्रह्मकमळ। तर–ओले।

ही राधिकेची टाच जणू सुवर्णकमळाप्रमाणे आहे असे कोणी म्हणतात, तर माझे अंतःकरण तिला चोहोकडून घेरलेला सुगंध धारण केला आहे असे तर शंभूराज कवी म्हणतात. कुणी कुणी तीस श्रेष्ठ लाललाल श्रेष्ठ खंड (मजले) म्हणतात. कमी हानिकारक असे कठोर (कठीण) अनुमानाने जेव्हा हलक्या डोळ्यांनी तिला अमृत (सुधा) पान पिल्यासारखे पाहात आहेत. तर अत्तर चोपडून सुगंधाचा झराच (स्त्रवणाऱ्या) झालेली उपमा (संबंध) तिला देत आहेत. सगळ्यांच्या दुःखाचे निवारण करून ती त्यांचे रंजन (खुशी) करीत आहे. गुलाबांच्या फुलांना दबवून टाकले आहे. असा देखावा निर्माण होत आहे. त्याचप्रमाणे ओल्या ब्रह्मकमळाप्रमाणे ती दिसत आहे. (टाचेचे हे श्री राधाविषयक वर्णन श्रेष्ठ रक्तिम फुले व सुवर्णपुष्पांच्या एकत्रित साठ्याचे (गुच्छ) फारच मनोहारी आहे. श्री शंभूच्या कारयित्री प्रतिभेचे हे जिवंत उदाहरण आहे. सूरदासादि पुष्टिमार्गी कवींच्या तोडींचे हे वर्णन ब्रजभाषा प्रेमींनाही खचितच आनंद देईल.)

## ५. गुल्फ वर्णन

**घेरदार घांघरेकी घूमनि अमोस मन।**
**मौललेनि देखत चलनि वह बामकी ।।**
**अहसि नैन जात मोखानि लीच।**
**छबनि नगीच है खरीदि बिन दामकी ।।**
**कहे शंभुराज नंदलाल जब बाल लखो।**
**भयो उर साल सुधि भूल गई धामकी ।।**
**कंचन बरासें गोल अतिही सुलुफ राधे।**
**रावरे गुलुफसों कुलुप खोली कामकी ।।५ ।।**

शब्दार्थ : गुल्फ = टाचेच्या वरचा भाग (नडगी) घाघरे = घाघरा (लहेंगा)। घूमनि = घेरा। अमोस = मूल्यवान गाढ। मौ = मित्र। वाम = वाकडा, शिव। छविन = बच्चा, बछडा। नगीच-(छोटा) दागिना। साल = छेदू, दुःख। धामकी = घराची। बरासे = विशेष। सुलुफ = कोमल। रावरे = सुंदर। गुलुफ = गुल्फ = नडगी। कुलुप = ताला, कुलूप । कामकी = कामदेवाचे।

घेरेदार घागऱ्याच्या घुमावदार (गोल) मौल्यवान गाठीमुळे मित्रांची

(मैत्रिणींचे) मन तिच्या तिरप्या चालीमुळे (चालण्याची ढब) दिवसाढवळ्या मयुरी (ललना) आपल्या डोळ्यासमोर चालत आहे. (असे वाटत आहे.) त्यावेळी पैसे न देता आपण छोटा दागिनाच खरेदी केला आहे असे भासते. कवी शंभूराज म्हणतात जेव्हा नंदलाल श्रीकृष्णाने हीं बाला (राधाजी) पाहिली तेव्हा ती त्यांच्या अंत:करणात रूतून बसली व त्यामुळे ती (बालिकाही) घराची आठवण विसरली. सोन्याच्या कोमल अशा श्रेष्ठ गाठींमुळे (गुल्फ) तुझ्या त्या अवयवाने जणू कामदेवाचे कुलूपच खोलले (मुक्त झाले) आहे असे भासते. गुल्फावयव (नडगी) सोनेरी सुंदर फुलून मुक्त झाले असे वाटत आहे.

## ६. नाभिका वर्णन

**रूप को कूप बखानत है कवि कोऊ तलाब सुधाही के संग को।**
**कोऊ तुफंग मोहोरि कहै दहला कल्पद्रुम भावत अंग को।**
**बारही बार विचार कियौ नृपशंभु जथा मत मो मति ढंग को।**
**सीसी उरोजनि तै मदधार रूमावली नाभी न प्याला अंगन को॥**

**शब्दार्थ :** तलाब = तळे। तुफंग = बंदूक। मोहारी = द्वार, मोठी मधमाशी। सीसी = छोटी बोतल। मदधार = मदिराधार। रुमावली = रोमावली (मऊ केशसंभार)।

काही कवी ही सौंदर्याची विहीर आहे तर कोणी हा अमृताचा तलाव(तळे) आहे असे वर्णन करतात. कोणी ही मोठी बंदूक नळी आहे तर कोणी हा कल्पवृक्ष (वेली) आहे. असे वर्णन करतात नृपशंभू वारंवार विचार करून आपल्या बुद्धीनुसार नवी व निराळीच कल्पना करतात. ही मादक द्रव्याची उरोजांची जणू बाटली आहे व त्यावरील रोमावलीने ही नाभी अनंगदेवाचा लवंडलेला प्याला (पेला) आहे. असा हा (अर्थालंकाराचा अपन्हुति अलंकार झाला आहे) अर्थालंकाराचा हा प्रकार अपन्हुति अलंकार, उपमा, उत्प्रेक्षा, रूपक इ. बरोबर कवीने शेवटी गुंफला आहे. अलंकाराचा हा संस्कार मनोहारी आहे. अलंकारवैपुल्य ही हिंदीमधील विशेष अशी रीतिकालीन पद्धती येथे दृग्गोचर झाली आहे.

कोणी लिपिकाराने 'नखशिख' या ग्रंथाचा अंत पुढीलप्रमाणे केलेला मिळतो,

**संवत् दस सै साठ सै, रितु वसंत मधु मास।**
**इस मैं उपमा लसत, नष शिष कियो प्रकास।।**
**इति श्री राजा संभाजू कृत नष–शिष वर्नन संपूर्ण।।**

हिंदी साहित्यातील बृहत् इतिहास (भाग ६) संपादक डॉ. नगेंद्र यांनी मिळविला. नृपशंभुकृत छंद क्र.२७ हा नाभीविषयक आहे. तर गणेशजी व श्रीराधाजीविषयक नखशिख छंद क्र.१ व २ (हस्तलेख संस्था २५२२)चे आहेत. डॉ. कृष्ण दिवाकर यांच्या भोंसला राजदरबार के हिंदी कवी या ग्रंथातही ही माहिती ग्रंथीत आहे. नृपशंभूचे उपलब्ध सहा पदानुसार, कविनाम क्रमशः संभू, नृपशंभु, शंभुराज (४, ५) ही मिळतात. राजा संभाजी हे नंतरच्या लिपिककाराने योजिलेले नाव आढळते.

## ७. मुख

**राधिका के आनन को बरनन कहा कीजै।**
**देखि नैन जी जै सो जुडावै सींची सुधा झर।**
**संभुराज वृजराज प्रान को, अधारें ताको।**
**पावै कौन पार सो बखानै सोभा कौन वर।**
**सहसन कोटि जोति ओटि के इकट्ठे कियो।**
**कैधो चतुरान सभेत दियो बर हर।।**
**फैलपट मंजु पर प्रफुल्लित कंज कैधों।**
**बसि रह्यो ससि आइ कंचन की बेलि पर।।६३।।**

श्रीकृष्ण राधिकाजींच्या मुखश्रीचे काय वर्णन करावे? ज्याने ज्याने ते पाहिले त्याला ते अमृताचा निर्झरच प्रवाहित होत आहे. असे वाटू लागले. शंभूराज कवी म्हणतात, व्रजराज(श्रीकृष्णांना) यांना तो प्राणाधार आहे. त्या शोभेचे (सौंदर्याचे) कोण ठीकठाक (कडेस नेणारे) वर्णन करू शकेल? सहस्त्र (हजारो) ज्योती एकत्र करून ब्रह्मदेवाने ते निर्माण केले आहे. त्याशिवाय भगवान शंकरांनीही त्यास (शंभू) वर दिला आहे. प्रफुल्लित कमळच जसे कामदेवाने सौंदर्यासाठी निर्माण केले आहे. सुवर्णवेलीवर राहण्यासाठी (मुक्कामासाठी) जणू चंद्रच राहण्यास आला आहे. (सुवर्णकांतीच्या शरीरावर चंदेरी कांतीचे सुंदर सुंदर असे आनन.)

## ८. नेत्र:

**अंजन समेतनील कंजन समान दृग।**
**रखत न ए काके मन रंवजन करत है ।।८।।**

या नेत्र वर्णनात संकोच, आळस, अंजन, वक्रतर, चांचल्य तसेच लालिमा गुणाचे वर्णन केले आहे. हे कुणाच्या मनास खंजन पक्ष्याची आठवण करून देणारे नाहीत? निळ्या कमळासारख्या डोळ्यांचे हे किती मनोहारी वर्णन आहे!

## ९. कुच

**उरमें उलहे मुलहे द्वै उरोज, सरोज करैं गुन दासव के**
**नृपशंभू जू कुंभी के कुंभ महा, सब कीजे बंधे रहै पासव के**
**फल श्रीफल के कहे आवति लाज, कहा गिरी श्रृंग है वासव के**
**सु मनो छकि अंक अनंग धरे, उलटाय पियाले द्वै आसव के ।।४०।।**

**शब्दार्थ :** उलहना = (उमडना) निर्माण होणे। मुलहना (मुलकना) हालणें, पुलकित होणे। दासव = इंद्र। पासव = (पासवान) चौकीदार। वासव = इंद्र। श्रीफल = नारळ। आसव = मदिरा।। अनंग= कमळ। कुंभी = हत्ती। कुंभ = गंडस्थळ।

उत्तुंगता, कठोरता, मोठेपणा, टोकदारपणा या परंपरागत वैशिष्ट्यांना व्यक्त करण्यासाठी कवीने श्रीफल, सुमेरू पर्वत, हत्तीचे गंडस्थळ, मदिरेचा उलटा धरलेला प्याला (मदिरा पात्र उलटलेले) अशा उपमानांचा उपयोग 'कुच' वर्णनात केला आहे. अर्थ स्पष्ट आहे कामदेवाची ही लीला स्तनमंडलासंदर्भात पृथ्वीस नमन करताना दिनारंभाच्या प्रारंभीच प्रातःकाळी जागे झाल्यावर करण्याचा प्रसिद्ध श्लोक : **समुद्रवसने देवी पर्वतस्तन मंडले। विष्णुपत्नीं नमोऽस्तुभ्यं पादस्पर्शं क्षमस्व मे।** सर्व भारतीयांच्या परिचयाचा आहेच (संस्कृत जाणकारांच्या नित्य प्रार्थनेतील)

## १०. केश

केशसंभार हा स्त्री सौंदर्याचा एक महत्त्वपूर्ण अंग (दागिना) मानला जातो. नृपशंभूनी केलेल्या केशवर्णनाबाबतच्या छंदात केसांच्या (उत्तमपणा) सौंदर्याची सारी लक्षणे विद्यमान आहेत. अशा विशेषणांनी युक्त केशसंभार

कुणास आकर्षित करणार नाहीत? प्रत्यक्षच वाचा– मालोपमा अलंकाराचे हे १० उपमांचे उत्कृष्ट उदाहरण आहे.

**केसन की समताई बहु ठौर पाई हम,**
**भूलि मति रही निज कंचन के भार में।**
**शंभुजू विमलताई मेघन में पाई**
**अरु सौरभ सुहाई पाई मृगमद छार में ।।**
**अहि में टेढाई, नरमाई पाई रेसम में,**
**निपट महिनताई स्याम चौंर तारमें।**
**घनता सिवार में झलक अलिहार से,**
**लमाई धूम धार में करवाई अंधकारमें ।।१०६।।**

**शब्दार्थ :** समताई = साम्य, सादृश्यता। ठौर = जागा (स्थान) कंचन = सुवर्ण (सुवर्णकांती)। मेघन = ढग। सौरभ = सुगंध। मृगमद = कस्तुरी। छार = कण, राखेप्रमाणे। अहि = सर्प। नरमाई = मऊपणा। निपट = बिल्कुल। महिनताई = मोठेपणा। चौर = चवर, चवरी। तार = केश, अलग-अलग। सिवार=अतिरिक्त, अधिक। अलिहार = भृगवृंद। लमाई = लबालब, लर्बाइ। धूम = धूर, धूम्र। करवाई = काळेपण। विमलताई = निर्मळपणा।

केसांचे साम्य आम्ही अनेक जागी पाहिले.(आमच्या पाहण्यात आले) सुवर्णकांतीमुळे (सोनेरी अंगकांत) आमची बुद्धी विचलीत झाली. शंभूराजे (कवी) म्हणतात, त्यांची विमलता (निर्मळपणा) मेघामध्ये तर सुगंध कस्तुरीच्या असंख्य कणांमध्ये (चूर्ण), सर्पासारखी (मडशार व नागमोडी) वळणदार (वाटोळी) वेणी, तर मऊशारपणा रेशमासारखा (रेशमात तो पाहिला) श्रेष्ठ असे अलौकिक (केवळ) काळेपण (कृष्णप्रभाव-श्लेषर्थाने श्रीराधेच्या केशसंभार काळाच) चामरी (चवऱ्या) च्या केसाप्रमाणे सुटेपण(तार) त्याप्रमाणे घनदाट अतिरिक्तपणा (फार अधिक) हा भृंगवृंदाच्या झुंडीसारखा (काळेपणाही) लांबसडकपण कुरळे केस ही अलौकिक सौंदर्यशोभा (दर्शन) लिबलिबितपणा (सुटेपणाही) धूम्रवलयासारखा, तर त्यांची कृष्ण (काळी) झलक अंध:कारासारखी! विविध विरोधाभासातील हे श्रीराधिकाजींचे केशसंभार वर्णन, कालिदासप्रभृति महान वैश्विक कवींची आठवण करून देत नाहीत काय? जय कवी शंभूराय!

## (१० अ) वेणी वर्णन

**काहू कह्यौ मार, काहू कह्यौ अंधकार करू।**
**काहू धूमभार, काहू सेवार संक को ॥**
**काहू अलि हार कह्यौ, काहू चौर बारकह्यौ।**
**काहू कह्यौ सुचि रुचि, मृग मृगमद पंक को॥**
**राधेजू की बेनी नृपशंभू मुख देनी थकी।**
**गिरी मति पैनि सब उपमानि रंक को ॥**
**भरयौ सुधा भार भज्यौ लगौ ही बार।**
**मनो सीस पीठि पार धार काढत कालंकको ॥**

(केशसंभाराचा हा आणखी रूपविस्तार संपादकास नगेंद्रांच्या इतिहासात मिळाला) कोणी तिला माळ, तर कोणी काळोख केला आहे, तर कोण धूर अथवा कोणास शेवाळाचा भ्रम होत आहे. कोणी तीस भुंग्याची माळ तर कोण चोरदरवाजा म्हणत आहे. कोणी तीस सुंदर पशूंचे शिंग तर कोणी कस्तुरीचा लेप (पंकील) असे नृपशंभू म्हणतात. राधेच्या वेणीस तोंडाने उपमा देऊन थकलो. वाणीची (सरस्वतीची) बुद्धीदेखील अत्यंत धारदार उपमा देऊन गरीब झाली. पूर्ण झालेला चंद्र (पौर्णिमेचा) उफाळू लागला आहे. जणूकाही मस्तक व पाठीवरून रस्ता काढून तो दोष नष्ट करत आहे. (एकूण १३६ हस्तलिखित प्रतीतील १३ पदे आम्हास मिळाली. अन्य पदांचा मागोवा काढणे आहे.)

## ११. वनमाला

**मनमोहन के उर की वनमाल ले आई चुराय सखी सर की।**
**तिय बैठी हुती गुर लोगनि बीच सुनैन सों हर की ॥**
**मुसक्यानि तिरीछी दुराई मुखैं तब ओंठ की कोर हरे फरकी।**
**नृपशंभू सुधाकर ही की बनी, मनो तुंग सुधा की कछू दरकी ॥८५॥**

**शब्दार्थ :** गुर = युक्ती, फूल। सैनन = इशारा। हरकी = संतुष्ट झालेली। दुराई = छिपाव, कपट। सुधाकर = चंद्र। तुंग = उंच। दर = तुकडा, दल, मंजील, भाव, कदर। सर की = चोरीची। सुनैन = सुनयना (राधाजी) मनमोहनजी (श्रीकृष्ण) ह्या वक्षस्थळावरील वनमाला ही सखीने (राधिकाजींच्या मैत्रिणीने) चोरून आणली. ती चोरीची वस्तू घेऊन लोकांच्यामध्ये ती युक्तीने

आनंदून बसली. (श्रीराधिकाजींच्या सोबत) कपटाने (दडवून) तिने तिरपा कटाक्ष करून मुख लपविले तेव्हा तिच्या ओठाचे टोक ती (राधिकाजी) आनंदाने बहरून गेले. नृपशंभू म्हणतात की, ती (श्रीराधिका) जणू चंद्रापासूनच (चंद्रसामग्रीने) बनवीत गेली आहे. जणू काय अत्यंत उंचीवर (उच्च जागी) असलेल्या अमृतापासूनचा हा तुकडा (शरीर हिस्सा) बनवला आहे असे (भासमान होते.)

**१२. कवी कलशकृत ब्रजभाषेतील संयुक्त रूपवर्णन**

बऱ्याच ठिकाणी विविध संपादकांनी (आचार्य मिश्रबंधू विनोद, डॉ. कृष्ण दिवाकर, मराठी भाषेचे जुने संशोधक वि. ना. कोठीवाले) उद्धृत केलेले पद त्यातील अंगकांती, अधर लोचन (नेत्र), स्मितहास्य, शरीरभूषण, दंतपंक्ती उद्धृत करीत आहोत. (नायिकाभेदमध्ये प्रौढ नायिकेच्या सुरतांत वर्णनासाठी ते शेवटी आलेलेच आहे.) शंभुराजांचे काव्यगुरू म्हणून छंदोगामात्य कवी कलशकृत हे पद इतिहासात आपले अलग स्थान राखून आहे. (संयुक्त रूपवर्णन–श्रीराधाजींचे)

**अंग अरसौंहे छबि अधरन सोहै चढी।**
**अलस की भोहैं धरै आभा रतिरोज की॥**
**'सुकवि कलस' तैसे लोचन पगै है नेह।**
**जिनमें निकाई, अरुनोदय सरोजकी॥**
**आछी छबि छाकि मंद मंद मुसकान लागी।**
**विचल विलोकी तब भूषन के फौज की॥**
**राजे रदमंडली कपोल मंडली में मानौ।**
**रुप के खजाने पर, मोहर मनोजकी॥१२॥**

**अर्थ :** प्रौढेच्या अंगकांतीची शोभा ओठांच्यामुळे (सौंदर्यामुळे) अधिकच वाढली आहे. आळसावलेल्या भुवयांमुळे रोजच्या रतिक्रीडेमुळे ती आणखी वाढली आहे. सुकवी कलश म्हणतात की, डोळ्यामुळे हा स्नेह राखला गेला आहे. त्याच्यात अरुणोदयाच्या व कमलकांतीची आभा मिळाली आहे. त्या सुंदर कांतीवर मंद स्मितहास्यही फार छान वाटत आहे. शरीरावरील विविध अलंकारांचा संभार पाहणारे चकित (विचलीत) होत आहेत. मुखमंडळावरील (गालामधील) दंतपंक्ती अशा शोभत आहेत कि जणू रूपसौंदर्याच्या खजिन्यावर कामदेवाने आपला शिक्का उमटवला.(कलशांची ही काव्यझेप गरूडझेप

नव्हे काय?)

### १३. भवानी –स्तुतिः

स्फटिकरचितपीठे, श्यामलांगीं भवानीं।
अरुणचरणकान्तिं, भासयतीं स्वरूपम्।
नखमणिगुणयुक्ता, अंगुलीं भासयन्तीम्।
विजितसितगरुद्भिः नूपुरैं गुल्फयुग्मम्॥१॥
पद्मरागारुणश्री श्रीकशिरः पुष्पेण शोभिताम्।
हतशीतांशुतेजस्कः मुक्ता चन्द्रोपशोभिताम्॥२॥
अतीव सुकुमारांगीं प्रोल्लसच्चचूर्ण(स्वर्ण) कुण्डलाम्।
भ्रूवल्लिभंगिसौंदर्यजितकामशरासनाम्॥३॥
मदिरामदसंघूर्ण, मदिराक्षीं मदालसाम्।
निर्मलादर्शसंदर्श, कपोलफकप्रभाम्॥४॥
विलत्भालतिलकां, मुक्तागुणसमन्विताम्।
विभासत् रत्नसंयुक्तां, कर्णभूषणशोभितान्॥५॥
नानालंकारासंयुक्ता, नासान्यस्तमयूरिकाम्।
पूर्णेन्दुहृद्यवदनां, प्रवालतुलिताधराम्॥६॥
सुवर्तुलस्तनद्वन्द्वमुक्ताकंचुकिकावृताम्।
चतुर्भुजां पद्महस्तां, पद्मनेत्रविराजिताम्॥७॥
रतिरक्तां, शंभुकान्तां, निम्ननाभिं तनूदरीम्।
कृशमध्यां, कृशांगींच, ध्यानयोगासने रताम्॥८॥
विलस्(द्र)क्तवसनां, रक्तकांचीपरिवृताम्।
विशा(ल) जघनां रम्यां, सौंदर्योदार्यामन्दिराम्॥९॥
सुवर्णरम्भां दंभारिम्, मृदुलोरुविराजिताम्।
कामे षुधिसुहृज्जंघां, जानुयुग्मोपशोभिताम्॥१०॥
इति चन्द्रचूडरमणीस्तुतिमेताम्।
धरणीश, शंभुरचितां अतिभक्त्या।
मनुजः पठेदनुदिनं स किलोच्चैः।
भुवि भारतीजलधिजानिलयं स्यात्॥११॥

श्लोकानुसार काही कठीण शब्दार्थ : १. भासयन्तीं = देदीप्यमान, गरुत् = पंख. गुल्फ = नडघी. २. श्रीकर = लालकमळ, शीतांशु चंद्र, कापूर. ३.

भ्रूवल्लि - भुवया. ४. आदर्श - दर्पण. ५. संघूर्ण-पुढे मागे, बाजूस फिरवून. ६. प्रवालतुलिताधराम्-प्रवाळासारखे लालचुटुक ओठ, ७. प्रवाल-नाजूक फुटणारे पान,Tender shoot of leaf. ८. रतिरक्तां-तांबूस. ९. निम्ननाभि-खोल, तनूदरीम्-सुंदर उदर. १०. इषुधि- बाण बाळगणारा. ११. जलधिजानिलय-वडवाग्निमध्ये घर असलेला.

**अर्थ :** बिल्लोरीच्या सफेद चमकत्या पत्थराचे आसन (पृष्ठभागाचे शरीराच्या (कृष्ण मेघवत्) भवानीदेवीच्या सोनेरी चरणशोभेचे, भासणारे हे स्वरूप, हे रत्नांच्या मण्यांनी युक्त असल्यासारखी नखे असलेल्या बोटांवर/ भासमान होत आहेत. पायाच्या नडघीवर (दोन्ही बाजूंच्या) (चार/नडघ्यांवर) असणारी पैंजणांची जोडी ही पंखे असलेल्या सुंदर पक्ष्यांना जिंकणारी दिसत आहे.(१)

मौल्यवान माणिक रत्नांप्रमाणे लाल कमळाच्या पुष्पाप्रमाणे ती शोभायमान (शोभत आहे) आहे. शीतल किरणे प्रसवणाऱ्या चंद्राचा तेजाचा साठा तिने हरण केला आहे. ती चंद्राच्याच उपमेने शोभा पावते आहे.(२)

त्या अत्यंत सुकुमार गात्रे असलेल्या देवीची सुवर्णकुंडले (कानाचे अलंकार) अधिक शोभायमान झाली आहेत. तिने भुवयांच्या (कटाक्ष) सौंदर्याने कामदेवाच्या बाणांनाही जिंकले आहे.(३)

प्रभावशाली नेत्रांच्या मदालसेप्रमाणे वारुणीने प्रभावित दृष्टिक्षेप करणारी व स्वच्छ आरशासारखी कपोलविभागांची (फलक) दाखविणारी कांती(तेज) तिच्या मुखमंडलावर दिसत आहे.(४)

तिच्या भालप्रदेशावरील टिळा मोत्यांच्या समन्वयाने विलास पावला आहे (शोभायमान झाला आहे). रत्नांनी संयुक्त झाल्यामुळे तिची कर्णभूषणे शोभायमान(सुशोभित) झाली आहेत.(५)

विभिन्न अलंकारांनीयुक्त असलेली व नासिकेशी जोडलेली मयुरिका (साखळी) पूर्णपणे चंद्राकृती प्रसन्न वदनावरील प्रवाळासारख्या दिसणाऱ्या ओठांवर (अधिकच) शोभायमान दिसत आहे. (६)

कंचुकीने (काचोळीने) झाकलेली पण सुटे झालेले स्तनद्वय हे व्यवस्थित वर्तुळाकार आहेत. ती चार हस्तांची व कमळाप्रमाणे दीर्घ व कांतिमान आणि कोमल असून ती आपल्या कमलवत् नेत्रांनी शोभायमान दिसत आहे.(७)

ती रतिदेवीप्रमाणे (लाल रंगाची) आरक्त असून शिवपत्नीची (शंभुकांता)

नाभी सखोल व शरीर नाजूक आणि तिचा उदरविभागही खोलगट आहे (सुंदर आहे.) तिची कटी कृश आहे. तिचे शरीरही कृशच आहे आणि ती ध्यानधारणा व योगासनांमध्ये मशगुल (गुंतलेली) रमलेली आहे.(८)

ती लाल रंगाचे वस्त्र परिधान केलेली आहे. रक्तवर्णीय पट्ट्यांनी ती (साडी-कमर) आबद्ध आहे. विस्तृत पृष्ठप्रदेश कटजानु प्रदेशाचे सौंदर्याचे ते श्रेष्ठ मंदिरच (आलय) आहे.(९)

तिच्या मृदुल मांड्या, सुवर्ण केळींच्या खुटांचे (त्यांच्या कांतीचे) गर्वहरण करणाऱ्या (रंग-मृदुलता इ.) आहेत. त्याचप्रमाणे गुडघ्यांच्या जोडीने (युग्माने) शोभणारा जंघाप्रदेश हा कामदेवाच्या बाणाप्रमाणे सुहृद्यवत् आहे. (मैत्री करणारा आहे.) (१०)

अशा तऱ्हेने चंद्राचा केशकलापबंध असलेल्या भगवान श्रीशंकराची पत्नी रमणीय भवानीदेवींची स्तुती (प्रशस्ती) असलेले हे (१ ते ११) श्लोक अत्यंत भक्तीयुक्त अंत:करणाने रचिले आहेत. प्रतिदिवशी (दिवसेंदिवस) मानवांनी ते खरोखर उच्चरवाने (मोठ्याने) वाचावे. तशाने पृथ्वीतलावरील भारतभूमीच्या सागरांवरील उपजलेल्या पवन देवतेप्रमाणे त्यांचे व्यक्तिमत्त्व होईल.(स्वत: कविरत्न शंभूराजे यांचेही व्यक्तिमत्त्व, समुद्रनिर्मित मेघ वाहणाऱ्या वाऱ्याप्रमाणेच होते. परमेश्वरा! या सुवर्णसुंदर पंक्तीतून केवळ अश्लील अर्थ पाहणाऱ्यांना तू माफ कर! )



**परिशिष्ट : १**

१. पूर्वोक्त प्राप्त नखशिखमधील पदाशिवाय संपादक अनुवादकास पुढील पंक्ती नखशिख या शंभुकवींच्या ग्रंथामधून प्राप्त झाल्या आहेत.

**अ) सहजहि रागपर जावत लगायो दाग।**

**ब)** जेथे नखशिखमधील स्वतंत्र अवयवांचे वर्णन झाले आहे, त्यातील एडी (टाच) नितंब (पृष्ठभाग) श्री चरण (पाय) चिबुक (गाल) तिल (तीळ) लबट (भाल प्रदेश) बेंदी (बिंदी) भृकुटि (भुवया) भुजा(बाहू), दंत (दंतपंक्ती) त्रिवली (नाभीप्रदेश निम्न भाग) अधर (ओठ) नासिका (नाक) वेणी (केशसंभार) नाभी, गुल्फ (टाचेच्या वरील नडघी) इ. चे स्वतंत्र वर्णन शंभूराजांच्या नखशिखमध्ये मिळते.

**क) कलंगा को दल जौन हे दुरंग लाली को।**

(नृपशंभुकृत नखशिख-संपा. जगन्नाथदास रानाकर पृष्ठ. १५२)

कलंगा-तुर्रा। जौन-यौवन। कलंगा हा तुर्की शब्द आपणास येथे कवीचे बहुभाषाविदचे व्यक्तिमत्त्व हटकून पटवून देते. त्याच्याशी योजिलेले दुरंग हा तद्भाव शब्द चपखलपणे योजिले आहे.

**ड) कौहर कौल जपादल विद्रुम... चाँदनी चुनरी के रंग होती है ।।१ ।।**

या नखशिखमधील(याच ग्रंथाच्या) तिसऱ्या पदातील 'पद' वर्णनातील वर्णन हे ''अरसात सवैयेचे'' आहे. या सवैयाचा अंतर्भाव रीतिकालीन कवींनी प्रचूर प्रमाणात केला आहे. सवैयामध्ये २२ पासून २६ पर्यंत वर्णसंख्या असते. कोणत्या तरी एका गणाची पुनरुक्ती असते. येथे आपणास २४ वर्ण आणि ७ भगण (भास्कर) तसेच शेवटी रंगण (रमास) असल्याने अरसात सवैयाचा हा प्रकार आहे.

OOO

## परिशिष्ट : २

**हिंदी भाषा (गुरू–शिष्यांची) :** या तीनही हिंदी पदकाव्यातील हिंदी समजली जाणारी भाषा खरे तर 'ब्रज–बोली' आहे. ब्रजभाषेचा मूलाधार ब्रजमंडळ असला तरी तिची व्याप्ती संपूर्ण ब्रजप्रदेश आहे. कान्यकुब्ज ब्राह्मण कवी कलश, त्याचप्रमाणे कवी भूषण इ. शिवरायप्रेमी मंडळींनी तिचाच उपयोग मोठ्या प्रमाणात केला आहे. हिंदीतील मानक भाषाशास्त्रज्ञ डॉ. हरदेव बाहरी, डॉ. उदय नारायण तिवारी, डॉ. देवेंद्र शर्मा किंवा अलीकडील डॉ. कपिलदेव द्विवेदी प्रभृतींच्या भाषाशास्त्रविषयक ग्रंथांतून जिज्ञासूंना 'ब्रजबोली'ची आणखी भरपूर माहिती मिळेल. पण येथे ताकापुरते रामायण माहिती हवे म्हणून मथुरा, आग्रा, अलीगड, धौलपूर, ग्वाल्हेर येथील भागात तिचा प्रमुख वापर आजही होतो. उच्च कोटीचे साहित्य या बोलीत मिळते. पश्चिमी हिंदीच्या अंतर्गत तिचा अंतर्भाव होतो. गंगा व यमुनेच्या दुआबमधील ही बोली असल्याने 'अंतर्वेदी' असेही तिचे दुसरे नाव आहे. बुलंद शहराजवळ तिच्यात खडीबोलीचे मिश्रण मिळते. डॉ. हरदेव बाहरींने हिंदीच्या सगळ्या क्षेत्रीय भाषावर (दक्षिणेकडील दख्खनी कवी वगळून) ब्रजबोलीचा व्यापक प्रभाव असल्याचे सोदाहरण सांगितले आहे. पश्चिमी हिंदीची ती प्रमुख बोली होय. मध्य युगात तिचा वापर भारतभर मोठ्या प्रमाणावर होता. नंतर ब्रिटिशांच्या आगमनाबरोबर दख्खनी हिंदी व खडीबोली यांच्या प्रभावामुळे साहित्यातही खडीबोली गद्य–पद्यात पुढे सरकली. 'हौं = मी/ नषसिष = नखशिख/ ण ऐवजी न/ तो = तर/ रहियौ = रहा/ काँकर = काँकड/ साँकरी = निमुळती' 'साँकरी गलयिन में काँकर चुभत हैं।'(अरुंद बोळातले खडे टोचतात) हे (काँकर= छोटे पत्थर) खडे ऐकणाऱ्याला मात्र गोड वाटतात.' हौं तो धाई तिहारे सुत की' मी तर तुझ्या मुलाची दासी आहे, असे यशोदामाई देवकीराणीला म्हणते. छोरा–छोरी = मुलगा–मुलगी। 'भूखन भनत सेर सिवराज है।।'(कवी भूषण म्हणतात, राजा शिवाजी सिंह होता.)

**नखशिख वर्णन :** या विषयावर रीतिकाळात अनेक ग्रंथ आढळतात. श्री हर्षाने 'नैषध' काव्याच्या दुसऱ्या सर्गात दमयंतीचे विस्तृत नखशिख वर्णन केले आहे. सूरदासांचे 'अद्‌भुत एक अनुपम बाग' हे राधेचेच उपमांनी लहडलेले नखशिख वर्णन सुख्यात आहे. रामचंद्र शुक्लांनी त्याचा खास उल्लेख आपल्या इतिहासात केला आहे. नृपशंभूनी मात्र या प्राचीन पारंपरिक

उपमांना दूर सारून काही नवेच चित्र उभे केले आहे. (डॉ. नगेंद्र शर्मा) या दोन्ही शृंगारप्रधान काव्यात, राधा फक्त वृषभानूची कन्याच नाही तर श्रीकृष्णपरमात्म्याची परमशक्ती आहे. आद्य प्रकृतीची दुर्गा, राधा, लक्ष्मी, सरस्वती व सावित्री अशी ५ रूपे होतात. त्यात राधेचे दुसरे स्थान आहे. नारदपांचरात्रात राधेची सहस्त्र नामे दिली आहेत.

राधा व कृष्ण ही दोघे एक प्राण, एकात्मा व एकतत्त्व आहेत. राधेच्या उपासनेवाचून श्रीकृष्णांच्या प्रेमाची प्राप्ती होऊ शकत नाही. (भारतीय संस्कृतीकोश भाग १० वरून) **शक्तिमार्गातील** ६४ शक्तूंची आवरण पूजा करावयाची असते. (विद्याराज्ञी मंचसाधनेतील ही नावे पाहा) जिज्ञासापूर्तीसाठी कुलेशी, कुलानंदा, वागीशी, भैरवी, उमा, श्री, शांती, चंडा, धूम्रा, कासी, करालिनी, महालक्ष्मी, कंकाली, रुद्रकाली, सरस्वती, वाग्वादिनी, नकुली, भद्रकाली, शशिप्रभा, प्रत्यांगिरा, सिद्धलक्ष्मी, अमृतेशी, चंडिका, खेचरी, भूचरी, सिद्धा, कामाक्षी, हिंगुला, बला, जया, विजया, अजिता, नित्या, पराजिता, विलासिता, घोर, चित्रा, मुग्धा, धनेश्वरी, सामेश्वरी, महाचंडी, विद्या, हंसी, विनायका, वेदगर्भा, भीमा, उग्रा, वैद्या, सद्गती, उग्रेश्वरी, चंद्रगर्भा, ज्योत्स्ना, सत्या, यशोवती, कुलिका, कामिनी, काम्या, ज्ञानवति, डाकिनी, राकिनी, काकीनी, काकिनी, शाक्तीनी व हाकिनी (पहा ललितासहस्रनाम स्तोत्र) (या सर्व ६४ शक्तींची शाक्त पद्धतीने खुद्द श्री शिवछत्रपतींनी ललिता पंचमीस (अश्विन शु।।५) २४ सप्टेंबर सन १६७४ साली पूजा केली होती.) सदर रयताभिमुख राज्याभिषेकाचे वेळी निश्चलपुरींना कवी कलशांनी साथ दिल्याचे संकेत नूतन शिवेतिहास संशोधकास मिळाले आहेत. या दुसऱ्या राज्याभिषेकाचे वेळी शिवछत्रपतींची विविध मसाले, वाख, लोखंडी खिळे विविध डाळी व धान्ये इ. प्रजेच्या नित्य उपयोगातील वस्तूंनी तुला झाल्याची माहिती श्री. बर्वे यांनी लिहिलेल्या दुसऱ्या राज्याभिषेकप्रसंगात मिळते. जिज्ञासूंनी हा दुसरा राज्याभिषेकही बारकाईने वाचावा. खुद्द गागाभट्टांनीही समयनय या संस्कृत ग्रंथात संभाजीराजांच्या सर्वसमावेशक व सुसंस्कृतपणाचे फार कौतुक केले आहे.(समयनय हा गागाजींचा ग्रंथ आहे) *(आणखी पहा, शिवाजीच्या दोन राज्याभिषेकाची चिकित्सा- ले. महामहोपाध्याय द. वा. पोतदार, श्री शिवचरित्राचे पैलू-संपा. डॉ. कमल गोखले)*

०००

**परिशिष्ट : ३**

**मराठी मुलखातील ३२ लक्षणे, रसिक तुकारामोक्तिनुसार, 'काय करावी ती ३२ लक्षणे, नाक नाही तेणे वाया गेली!'**

१) रंग- गहू वर्णी, निमगोरी, शामल, पिट्ट गोरी.

२) डोळे- निळेशार, आकाशी, जुलमी (मदभरे), झोपाळू

३) भुवया- रेखीव, कमानदार, दाट-भरीव.

४) केस- लांबसडक, काळेकभिन्न, सोनेरी, कुरळे

५) नाक- सरळ, धारदार, नथनी, हिरा धारणेस, अनुकूल पेलटी (इतिहासप्रसिद्ध हेलेन, क्लेवोपात्राही सुंदरीचा संदर्भ)

६) कान- उभट व पातळ कान सुंदर लाजल्यावर लालेलाल (क्रोधानेही)

७) मान- उंच (साधारण) मान, आरसपानी (मस्तानी)

८) बांधा- वक्ष, कंबर, नितंब यांची ठेवण प्रमाणबद्ध

९) वक्ष- आकारमानाचे वैविध्य

१०)उंची- सौंदर्यसम्राज्ञी ६" / ५.८" (कमीत कमी)

११)पाय- पाऊल लहान, नितळ, लांबसडक, प्रमाणबद्ध (गुडघ्यापर्यंत)

१२)हनुवटी- गोल, चौकोनी, उभट, हनुवटी जाड नसावी, लहानही नसावी व गळा कुठून सुरू होते हेही कळू नये.

१३)गाल- गोरे गोरे, फुगीर तर फार उठावदार नसावे.

१४)ओठ- मुलायम, रेखीव, कमानदार, राठ व एका बाजूस वाकडे नको, दोन्ही बाजूस समतोल, लवचिक, घाबरणे, लाजणे या भावात ते दाबून व्यक्त, चुंबनास लैंगिकमध्ये खासे महत्त्व, भाषेच्या उच्चारास, पंचवर्गात महत्त्व.

१५)जीभ- टोकामुळे निमुळती व पातळ, लालसर सुंदर, लांब जीभ छान

१६)(लांबसडक) बोटे- कलानिपुण, चित्रकार, नृत्यमुद्रानुकूल

१७)नितंब- वक्ष व कमरेशी प्रमाणबद्ध. नऊवारीने नजरेत.

१८)कंबर- सिंहकटी, द्विजराज मुखी-वनराज (मृगराज) कटी

१९)ओटीपोट- सपाट-सुंदर, योगादिक व्यायामाने प्रमाणबद्ध

२०)खांदे- (पाश्चात्य) पोशाखात पॅकिंग, पूर्वी उंच बाह्याची फॅशन

२१)कपाळ- आभूषणार्ह मोठे, कपाळ वाचणे अवघड बाब.

२२)पापण्या- डोळ्यांचे सौंदर्य हमखास वाढवणाऱ्या खुलवणाऱ्या असाव्यात.

२३)मांड्या- थुलथुलीत व मांसलही नको. निमुळत्या लांब पायाने लांब हा अवयव सुंदरता व मादकता यांच्या सीमारेषा ठरवणारा आहे.

२४)पाऊल- लहान असावे, चवडा व टाचेत बाक असावा.

२५)चवडा- पुढचा भाग फताडा नको.

२६) टाच- सबंध शरीराचा भार चवडा व टाचेवर शरीर पेलणे, त्यांच्यावर म्हणून टाचांना महत्त्व. मागील बाजू पूर्ण गोलाकार व पुढे निमुळती किनाऱ्यास भेगा नको. (आजकाल सौंदर्य प्रसाधनगृहात Pedicure पेडीक्यूअरला महत्त्व)

२७)पायाची बोटे - बोटे सरळ, बाक नसलेली करंगळीकडे लहान होत गेलेली, ती प्रमाणबद्ध असावीत. काहींच्या मते, करंगळी नष्ट होणार.

२८)पोटऱ्या- मागच्या बाजूने किंचित भरलेल्या, मध्यभागी फुगीर व खाली जास्त निमुळत्या. दांड्या पोटऱ्या बऱ्या नव्हेत. वर त्वचाही सफाईदार हवी.

२९)हाताचे कोपर- दुमडल्यावर खालच्या अंगाने टोकदार कोनात हवे. वरच्या अंगास वळी पडणार नाही असे असावे. आभूषणे (पाटल्या, बाहूबंद) घातल्यावर कोपरे सुंदर दिसावेत.

३०)आजानूबाहू- लांबसडक गुडघयापर्यंत हात सौंदर्यलक्षण
ज्यांचे हात आखूड व थोटे ते विचित्र साधूजन पहा.

३१)कंठ- कंठमणी किंचितसा बाहेर आलेला हवा. (Adam's Apple) बोलताना व गाताना लवचिक हवा.

३२)नखे, दात व डोके- दातांची ठेवण हसल्यावर दिसली पाहिजे. पण हसल्यावर खालची ठेवण दिसली न पाहिजे. गौतम बुद्धांचे डोके मधोमध वर असल्यासारखे टोप घातल्यासारखे. नखे नवनवीन दिसावीत. (अंगसमुद्रिकातील ज्योतिषनुसार)



## पदानुक्रमणिका (सातशतक)

सातशकत (संदर्भ क्रमांक)

# सातशतक

सात हा हिंदी भाषेतील शातचे ब्रज रूपांतर होय. शतचा अर्थ हर्ष (समाधान, आनंद) असा आहे. मनापासून व अंत:करणापासून कवीस या १०० पदांनी आनंद झाला आहे. कवी भृतहरीप्रमाणे शंभूराजेही उत्तर आयुष्यात वैराग्याकडे वळले आहेत. पूर्ववर्ती ग्रंथापेक्षा या ग्रंथाचे स्वरूप वेगळे आहे. प्रारंभिक ७ छंद, प्रस्तावना रूपात विविध देवतांची स्तोत्ररूप वंदना आहे. त्यात श्रीगणेशजी, सरस्वती, पार्वती, श्रीराम, खगराज (गरूड) सनकादिक शुकदेव यांचा अंतर्भाव आहे. या ग्रंथाबद्दलचे डॉ. जयसिंगराव पवार यांचे मत पहा,''संभाजी महाराजांच्या सर्व ग्रंथांमध्ये आपले लक्ष वेधून घेतो तो त्यांचा अध्यात्मवादी **सातशतक हा ग्रंथ**! नायिकाभेदसारखे शृंगारप्रधान काव्य लिहिणारा राजा, सातशतकसारख्या अध्यात्मवादी ग्रंथही रचू शकतो ही गोष्ट संभाजी महाराजांच्या व्यक्तिमत्त्वाची उंची वाढविणारी ठरते.''(छ. संभाजी स्मारक ग्रंथवरून).

हे दोहे आपण मुळातच पाहिल्यास शंभूराजांच्या विशाल भाविक हृदयाचे दर्शन होते. नागरी प्रचारिणी सभेतील हस्तलेख सं.२५२९ प्रमाणे छंद १, ३ व क्र.४ चे दोहे पुढीलप्रमाणे-

**१. सीता पग नष चंद की भजि कै संभ समाज।**
**सात शतक ग्रंथहि रच्यो, संतन के हित काज।।१।।**

श्री सीतादेवींच्या चरणाच्या नखचंद्रास आराधून शंभूराजांनी, समाज व संतांच्याही हितासाठी सातशतक ग्रंथाची निर्मिती केली आहे.

**२. मो मन मधुकर संत हित भऱ्यो ग्रंथ रसविंद।**
**चित्रकूट के सिर्लान जे फूल पग अरविंद।।३।।**

माझे मन संतांच्या हितासाठी भ्रमर झाले आणि हा ग्रंथ प्रेमरसाने भरला, चित्रकूटमधील (श्रीराम, सीता, लक्ष्मण) पवित्र चरणारविदांच्या प्रभावाने जे पारिश्रमिक तेथील दगडावर फुलले तोच हा प्रेम रस होय. त्या कमल (चरण) भोवतीचा हा भ्रमर (मन) गुंजारव करो,

**३. सो रस पाइ छके महा सनकादिक सुक सेस।**
**संभराज षगराज, मुनि, गिरजा. गिरा गणेश।।४।।**

तो (प्रेम) रस पिऊन शुक्राचार्य, शेषदेव, सनकादिक मुनी तसेच खगराज गरूड, गिरीवरकन्या पार्वतीदेवी, सरस्वती व प्रत्यक्ष गणेशजीही संतुष्ट झाले असे शंभूराज संतुष्ट झाले असे लिहितात.

या वंदनाच्या नंतर 'सातशतक' या ग्रंथाच्या प्रतिपादनात्मक विषयासंबंधी संकेत एका दोह्यात दिला आहे. तो दोहा असा :

**४. उपालंभ कहि विनै कहि, जगत सीष कहि ध्यान।**
**ब्रह्म निरुपम कुछ कहरो, जाते बाढत ग्यान।।८।।**

काही टोमणेवजा(टोचून बोलणे) बोलण्यापेक्षा जगाच्या शिकवणुकीकडे मी लक्ष देत आहे. काही ब्रह्मनिरुपणात्मक सांगण्याची माझी इच्छा आहे. त्यामुळे ज्ञानवृद्धीही वाढते. विनय (नम्र प्रार्थना) असल्याने जनोपदेश शीर्षस्थ आहे.

हा सगळा ग्रंथ काही वेचक (१) उपहास (२) विनय (नम्रता) (३) जगाची शिकवण (४) ध्यानधारणा व (५) ब्रह्मनिरुपण किंवा ब्रह्मविचार या पाच उपभेदात्मक मथळ्यात विभागला गेला आहे. लिपिकाराने हा ग्रंथ ज्यावेळी नखशिख लिहिला (उतरला) त्याच वर्षी (संवत १८०० चैत्र महिना) भाद्रपद महिन्यात उतरून पूर्ण केला. हिंदी भाषेतील सातचा अर्थ हर्ष (समाधान) असा आहे. हे समाधान शतकैद आहे. इ.स. १६८८ साली संभाजी ग्रीष्म ऋतूत रायगड-विशाळगडावरील वाटेत राहिले होते. त्यांच्या मृत्यूपूर्वी एक ते दीड वर्षाआधी संभाजीराजांमध्ये बरेच परिवर्तन झाले होते. भृतहरी खरे तर त्यांचा आदर्श! कवी कलश यांनी मंत्रसिद्धीसाठी हे आनंद व समाधान देणारे एकांतादि स्थान निवडले होते. या ग्रंथाचा प्रारंभ याचवेळी व मृत्यूच्या काही दिवसांपूर्वी त्याची समाप्ती झाली. मृत्यूच्या वेळेस,काही संकेत दिसतात. या संदर्भात डॉ. कृष्ण दिवाकरांनी उद्धृत केलेला छंद पुढीलप्रमाणे (सातशतक छंद ६२८)

**५. छत्र, गज, चमर, तुरंग अगनित संग।**
**एते पर मन ना गरुर गहियतु है।।**
**असन विहूँने अंग वे वसन सूँने राषो।**

लोक निंदा भाषो सुष मानि सहियतु है।।
दूषण तुम्है जे देत मुगुध अचेत प्रभु।
करिहौ उहे पे जाको जैसो चहिअतु है।।
सैंभ षोइ महीपाल कहै सुनिए गोपाल।
हम हरि हाल तुम सौ निहाल रहियतु है।।२८।।

या छंदावरून असे कळते की, छत्रपती असल्याने त्यांच्याजवळ छत्र, गज, चामर(चवऱ्या), असंख्य घोडे इ. ऐश्वर्याच्या अगणित वस्तू असूनसुद्धा त्यांच्या मनात कोणताही अभिमान अथवा अहंकार नव्हता. संभाजीसारख्या क्षत्रिय राजामध्ये ही वैराग्य भावना पाहून काही मंडळींनी त्यांची निंदाही केली; पण त्यातच सुख मानून ती त्यांनी सहन केली. दृढनिश्चयी असल्यानेच संभाजींनी त्यात सुख मानले आणि परमेश्वराला स्वत:स अर्पण करणे पसंद केले. प्रभूस (परमेश्वरास) जे दूषण देतात ते मूढ अचेतन होते. त्यांना ही तो(अचेतनाही सुंदर करतो) जो जसा त्याची(परमेश्वराची) इच्छा धरतो तसेच त्याचे समाधान होते. शंभूराजे म्हणतात, गोपाळा (श्रीकृष्णा) ऐक, ''मी माझी सारी जबाबदारी तुझ्यावर सोपवतो.'' संभाजीराजे कमालीचे आस्तिक होते हे यावरून सिद्ध होते. येथे तुका म्हणे माझे संतावरी ओझे, या उक्तीचे स्मरण होते.

सातशतकांमध्ये परमेश्वराची चर्चा कित्येक जागी केलेली आहे. संपूर्ण ग्रंथात पौराणिक संदर्भाचे दाखले पुष्कळ दिसतात. १) गजेंद्रमोक्ष २) प्रल्हाद ३) गणिका (पिंगला इ.) ४) ध्रुव ५) सुदामा ६) नामदेव ७) रैदास(रविदास) इ. भक्तांची उदाहरणे देऊन त्यांच्याप्रमाणेच स्वत:चाही स्वत:च उद्धार करण्यासाठी त्यांची प्रार्थना आहे. पुढील काही छंद पाहा.

७. संभराज कहै मेरी पति तुअ हाथ रहे।
लमेरे मन इहै तुम बिन लगावै तीर।।३१।।

८. अति प्रबल घेरे आठों जाम मोहि।
दीनबंधु अव क्यों न लागत पुकारि हौं।।
सब ही संकट नेवाई एक कोर ताके।
तब जानि हौं जू जब मो तन निहारिहो।।
ज्यों भाँति हरिनकसिप को विदाऱ्यौ उर।।

तिन भाँति कब मेरे दुष को विदारि हौं ।।३२।।

९. संभ कहै सुनि दीनदयाल सो।
मेरी हँसी भए, तेरी हँसी है।।३३।।

या क्र. ३१, ३२, ३३ च्या छंदाचा मराठी अर्थ पुढीलप्रमाणे. हे परमेश्वरा, माझे स्थान (ठावठिकाणा) आता तुझ्या हातात आहे, असे श्री शंभुराज (कवी) म्हणतात. पुढे ते असेही म्हणतात की, माझे मन इहलोकात तुमच्याशिवाय देखील अध्यात्माकडे किनाऱ्यावर (तीर) कसे पोहोचणे शक्य आहे?

अष्टौ प्रहर(२४ तास, सदानकदा) हे मना (ही सारी संकटे भोवती) फार शक्तिशाली रीतीने मला वेढून आहेत. हे दीनबंधू परमेश्वरा! तुम्ही मला का पाचारण करीत नाही? सगळी संकटे दूर करून आपण एक वेळ दृष्टी टाकावी. मी तुम्हास तेव्हाच जाणेन की, जेव्हा तुम्ही माझ्याकडे(शरीराकडे) पहाल.

ज्याप्रकारे आपण हिरण्यकश्यपचे (राक्षसाचे) उदरविदारण (पोट फाडले) केले (भक्त प्रल्हादाच्या कृपेसाठी) त्याचप्रकारे माझ्याही दुःखांची चिरफाड करा. नंतरच्या पदाच्या (क्र.३३) शेवटी शंभुनृप म्हणतात, हे दीनदयाळा (परमेश्वराचे खास विशेषण) माझ्यासारख्या गरिबाची वाणी (म्हणणे) अशी आहे की, जर या जगात माझे हसे झाले तर ते आपलेच हसे झाल्यासारखे आहे.(माझी फजिती ही आपलीच फजिती असेल.)

हा पदविभाग राजांच्या अंतिम काळाचा असावा, असे डॉ. दिवाकर यांचे म्हणणे आहे. त्याचप्रमाणे खेळण्यात बालपण संपले. तरुणपण युवतींच्याबरोबर मिसळून गेले. ज्यावेळी प्रेमाबद्दल गोडी वाटत असे, वृद्धापकाळाची चाहूल लागताच हे सगळे फिके पडले व फकिरीकडे वळावे वाटले. अनेक रंगात मन रंगले आता शामरंगात (मात्र सावळ्या कृष्णाकडे) ते रंगू लागले आहे.(या पदावरील वृद्धापकाळाच्या संदर्भामुळे पदकर्तृत्वाबद्दल शंका संभव आहे. बालपणात व तरुणपणात भाकित न करण्याचे संकेत व भौतिक विलासात असल्याबद्दलचा पश्चात्ताप त्यांच्या ज्या छंदात मिळतो अशा वर्णनाची परंपरा संतसाहित्यातही आहे.

११. ब्याल मे रंग गए नृपशंभू। बालकताई रही जब वे है।
जोबन में जुबतीनके साथ रँगे, अनुराग लगी अति लै है।

**आवत ही जर फिके परे कहूँ को बोरन दे है।**
**रंग अनेक रँगे मन मेरे कहूँ रँग साँवरे में रँगी जै है।।७०।।**

यातील आयुष्यातील रंग फिका पडल्यावर पळून जाण्याबद्दलचा संदर्भ वादग्रस्त आहे. पण अशा प्रकारे सगळ्या ग्रंथात तत्त्वनिरुपण, उपदेशात्मक विचार, प्राचीन उदाहरणे इ. बरोबर त्यांच्या जीवनातील काही प्रसंगांचा संकेतच असतो. हा ग्रंथ बुधभूषण, नायिकाभेद, नखशिख रचनेनंतरचा दिसतो. हीच त्यांची शेवटची साहित्यिक कृती! निरुपणात्मक शैलीत तो आहे. ती इ.स.१६८९ च्याच आसपास लिहिली गेली असावी. उपदेश देणे हेच या ग्रंथाचे इप्सित आहे.

संभाजीराजांचा हा त्यांच्या घनगंभीर व्यक्तिमत्त्वाचा आणखी निराळाच पैलू दाखविणारा हा ग्रंथ आहे. आजपर्यंतच्या अनेक मराठी साहित्यकृतीत बुध्याच रंगवलेली विलासी व दुराचारी व्यक्तिरेखा मुळीच नव्हती. ते सुयोग्य राजनीतीज्ञ, अत्यंत पराक्रमी, 'त्याचप्रमाणे काव्य-साहित्य पुराण गीत कोदंड विद्यार्णवपारगामी' त्यांनीच म्हटल्याप्रमाणे होते.

'सातशतक' ग्रंथामुळे त्यांचे राजा जनकाप्रमाणे संसारात राहूनही वैराग्याबद्दल प्रवृत्तीचेही या ग्रंथावरून असलेले घनगंभीर रूप आपणास दिसून येते. अन्यत्र (बुधभूषण) आढळणारे त्यांचे नीती, शृंगार व वैराग्यशतककार भृतहरीचे प्रेम या तीनही शाखांत आपणास त्यांच्या या विभिन्न काव्यकृतीत आढळून येते. त्यांच्या भाषाप्रभुत्वावर कमी वयात (अवघ्या ३२ वर्षांच्या आयुष्यात) संस्कृत ब्रजकाव्य करण्याच्या प्रतिभेवर वाचक प्रसन्न होतो. इतके हिंदीवर त्यांचे प्रभुत्व कसे? नृपशंभूचे काव्यगुरू कवी कलश होते. कलश स्वत: हिंदी भाषी व उत्कृष्ट कवी होते. शिष्याच्या काव्य प्रकारावर गुरूचा प्रभाव साहजिकच असावा.(कृ. दिवाकर)

लहानपणी उत्तर भारताची यात्रा. औरंगजेब पुत्र मुअज्जमशी मैत्री, अकबराशी (औतवीशी) पत्रव्यवहार, दरबारातील हिंदी सामन्त (रामसिंह इ.) मुळे हिंदीवर प्रेम व स्वाभाविक काव्यरूची यामुळे अनेक भारतीय (विशेषत: उत्तर भारतीय भाषांची बोलीसह जाणकारी) भाषांचा त्यांना परिचय होता.

रयताभिमुख दुसऱ्या राज्याभिषेकाच्या वेळी २४ सप्टेंबर १६७४ (ललिता पंचमी) रोजी निश्चलपुरी गोसावींच्या(गोस्वामी) बरोबर त्यांनी समारंभात

पौरोहित्य केल्याचीही माहिती उपलब्ध झाली आहे.

अत्यंत कमी वयातील त्यांच्या बहुमोल राजकीय कामगिरीबरोबरच साहित्यिक जाण व साहित्यनिर्मितीची क्षमता नुसतीच वाखणण्यासारखी नाही तर महाराष्ट्र भूमीला ललामभूत करणारी आहे. पिताश्री व पितामहांच्या कर्तृत्वावर हा सर्वार्थाने चढलेला सुवर्णकळस आहे. 'सातशतक' ग्रंथ'या विधानाची स्पष्ट साक्ष देणारा ग्रंथ आहे.

**गुणा: पूजास्थानं, गुणिषु नच लिंग नच वय:।**

(गुणीजन हे नेहमी पूजनीय स्थान प्राप्त करतात. त्यांना लिंगभेद व वयाचे (आयुर्मान) बंधन नसते.)

तत्त्वज्ञ व चिंतकाची भूमिका असणारे भक्त प्रल्हाद व भक्त ध्रुव हे संभाजीराजांचे उत्तर आयुष्यातही आदर्श आहेत हे या 'सातशतक' ग्रंथावरून दिसून येते.

अध्यात्मप्रधान अशा ग्रंथाची निर्मिती आपल्या कमी वयातच त्यांनी केलेली आहे. त्यांचे अध्यात्मचिंतन खरोखरच कुणासही आश्चर्यचकित करील. तसे तर त्यांचे जीवनच आपल्या पित्याप्रमाणे केवळ आश्चर्यांची शृंखला होय; पण हिमालय जसा कुठूनही व कधीही पाहिला तरी भव्य-दिव्यच वाटतो व तसाच तो खरोखर आहे. तीच स्थिती या पितापुत्रांची (शिवशंभू) आहे.

या ग्रंथातील एखादे पद त्यांच्या जीवनातील विचारसरणीशी विसंगत वाटते. जसे ब्याल में रंगी गए-पद क्र.७०) लिपिकारांचाही उद्योग विविध, कारणानुसार असू शकतो स्वत: कवीही विविध संदर्भात लिहिताना लेखनाभिवेशात काही लिहूनही जातात. वृद्धापकाळ आला असतानाही त्याचा उल्लेख म्हणूनच असा संशयास्पद झाला आहे. वस्तुत: आत्मनिंदेची प्रथा संतांमध्ये असतेच.

संभाजीराजांचे अध्यात्मावरील विचार त्यांचे भाष्य बऱ्याच प्रमाणात 'बुधभूषण'मध्येही तिसऱ्या भागात सुभाषितांचा परामर्श घेताना स्पष्ट झालेच आहे, पण येथे सातशतकात ते अध्यात्मप्रवण प्रवाहात इतके समरस झाले आहेत की हा एक तत्त्वज्ञ राजाचाच ग्रंथ वाटावा. राजा भृतहरी हा शंभूराजांचा आदर्श आहे. मधुमक्षिका व्रताने सातशतक ग्रंथाची पदे मिळविताना माधुर्य गुणाचे उदाहरण मिळविताना पुढील पदही मला प्राप्त झाले. तो त्या छंदातील

शेवटच्या चार ओळींचा हिस्सा आहे. (जिज्ञासूंनी ते संपूर्ण पद अवश्य शोधावे) पाहा.

१२. वृंदावन कुंजन में गुंजत मधुप कुंज।
कुंज बनि रहे सुर लोक के अषारे से।।
तहाँ संभुराज मैं विलोके वृजराज जा पैं।
अंग अंग वरिए अनंग अंग छोर से।।७९।।

वृंदावनातील कुंज वनामध्ये भ्रमरवृंद गोड गुंजन करीत आहेत. देवभूमीमध्ये देखील त्यांच्या अक्षरभूमीमध्ये हे उद्यान आपले स्थान अक्षुण्ण राखेल. (हे वृंदावन उद्यान त्यांच्याही देवउद्यानात फार शोभूनच दिसेल) तेथेच शंभूराज कवी व्रजराज श्रीकृष्णांना पाहून त्यांच्या अंग प्रत्यंगावर आपणास स्वत:स तृप्तदृष्टी करून) प्रत्यक्ष कामदेवांनीही आपली गात्रे ओवाळून टाकावीत असे वाटते. अत्यंत साध्या व सोप्या आणि सरळ शब्दांतील हे कृष्णसौंदर्य किती अनुपम आहे! रसखानांच्या तोडीचे हे काव्य आहे.

माधुर्य गुणाच्या अंतर्गत श्रुतिसुखदता, समासहीनता, उक्तिवैचित्र्य, आर्द्रता (हृदयाचा ओलावा) भावमयता, आल्हादता, चित्ताकर्षकता इ.चा अंतर्भाव होतो. शृंगारात करुण व शांत या गुणांचा व रुकार व नकार व अनुस्वारयुक्त वर्णांच्या (पंचमवर्ण) आवश्यकतेवर विशेष उल्लेखावर भर दिलेला असतो. वरील शंभूराजांचे उदाहरण (सर्वच) आचार्य स्वीकृत गुणांनी युक्त आहे.

मधुरशैलीसाठी आपणास त्यांचे गुरू कवी कलश यांचे छंद या विवेचनात शेवटी मुद्दाम दिला आहे. वीररसप्रधान व वीरश्रीयुक्त अखंड जीवन जगणाऱ्या शंभूराजांचे हे काव्य सह्याद्रीमधील कातळातील झराच नाही का?
वक्रोक्ती हा अलंकार भारतीय समीक्षाशास्त्रातला मानदंड आहे. या वक्रोक्ती सिद्धांताचे प्रवर्तक आचार्य कुंतक मानले जातात. काव्यात जे काही सुंदर, चमत्कारपूर्ण अथवा अलंकृत असते. तो सगळा वक्रोक्तीचाच चमत्कार असतो असे कुंतकांचे मत आहे.

पदवक्रता या एका वक्रता अलंकाराचे आपणास सातशतकात पुढील उदाहरण मिळते.

१०. संभुजू जग ही उपदेस कै ढगहि नहीं।
चीन्हत दृग हि सो न चेत चित चहा भी।।६५।।

शंभूराजे म्हणतात, जग हे उपदेशामुळे फसविले जाणार नाही, पण जागृत चित्ताने इच्छिले नाही तरी दृष्टीने ते कळविले (जाऊ शकते) जाते. शांत व प्रेमळ दृष्टीचा हा प्रभाव फार प्रभावशाली असतो, असा संकेत या पंक्तीमधून आपणांस मिळतो.

वर्णविन्यास वक्रतेसंदर्भात पुढील उदाहरणातील वर्णाची अनुप्रासछटा पहा.

**मो तन ताकि बडी आँखियान तें। काँकरी लै फिरि मोतन धाँकरी।।**
**काँकरी ओडि लई करतें पैं करेजे । कहाँ धौ गई गडि काँकरी।।**

हे वस्तुत: नायिकाभेदमध्ये (माधुरी पत्रिकाह-५२७) काँकरी शब्द तीन वेळा विभिन्न (निरनिराळ्या) प्रसंगात व अर्थासह पाहण्यासारखा आहे. (काँकर=खडा (ओडना-आडवणे), हाताने अडकवलेला) त्याचप्रमाणे काँकरी, कर, करेजे कहाँ या शब्दातील "क"वर्णप्रयोगाची त्यांच्या या ग्रंथाची उपलब्ध प्रति सं.१२०० च्या भाद्रपद महिन्यातील केलेली(प्रतिलिपी आहे.) तो लिपिकात्मक पुढील दोह्यात मिळतो.

**१३. संवत दस सै साठ सै, औ द्वै भादव मास।**
**चौदासि पुनि अनंत की, कीन्हो ग्रंथ प्रकास।।१३।।**

हा काळ संवत १८०० अर्थात इ.स.१७४३ हा प्रतिलिपी काळ आहे, रचनादर्शक नाही.

या ग्रंथाच्या निर्मितीबद्दल डॉ. कृष्ण दिवाकर यांचे मत बरेचसे चिंतनीय व विचारार्ह आहे. ते आपल्या 'भोंसला दरबार के हिंदी कवी' या ग्रंथात लिहितात. "एक से बढकर एक आपत्तीयों के कारण संभव है कि संभाजी का मन लौकिक ऐश्वर्यसे उब गया हो और अध्यात्मिक क्षेत्र में शांति पाने के लिए आकर्षित हुआ हो। इतनी आपत्तियोंके बावजूदभी संभाजी का रसिक मन फुरसत के समय साहित्य को पढने तथा सृजन करने में व्यस्त रहता और थोडे समय के लिए संघर्षमय जीवन से कुछ दूर रहकर आनंदित हो जाता होगा।"

विविध साहित्यालोचकांनी प्रकट केलेले या साहित्यकारणातील सद्य:परनिवृत्तये (तात्काळ उपरोति व संतोष) हेही एक कारण असावेच. तरीही "संतन केहित"(संतांच्याही हितासाठीच) हा मोठा पल्ला व विशाल धारणा या छोटेखानी अध्यात्म ग्रंथात प्रारंभीच ग्रंथकर्ते शंभूराजांनी प्रगट केली

आहे. हा फिलॉसॉफर (तत्त्वज्ञ) राजा आहे. याचा सर्व मराठी भाषकांना व समग्र भारतीयांनाही अभिमान वाटला पाहिजे. शिवरायांना सर्वार्थाने शोभणाऱ्या सुपुत्राची ही साहित्यिक कामगिरीही फार मोलाची आहे. छ. संभाजीराजांच्या अध्यात्मिक उन्नतीचा चढत्या क्रमाचा आलेख त्यांच्या संपूर्ण ३२-३३ वर्षांच्या, पार्थिवाचा असला तरी तो सिकंदरप्रभृती जगजेत्याशी व सीझर, नेपोलियन आदी कोणत्याही शूर वीरापेक्षा कमी सरस नाही. त्यांच्या बलिदानास प्रा. श. श्री. पुराणिक यांनी Courage of Conviction किंवा Spiritual courage आत्मिक धैर्य (अनुभूती) किंवा (आत्मिक बल) म्हटले आहे. हे सर्वथैव बरोबर वाटते. संगमेश्वराच्या अखेरच्या काळात निर्माण झालेल्या या 'सातशतका'ची सांगता त्यांच्या अमर जाण्याने झाली. 'निर्वेदभाव' व शांतीरसाचे हे अजब उदाहरण आहे.

'सातशतक' हे काव्य शांती, करुण व अध्यात्मपरक (पारमार्थिक)आहे. सदासर्वकाळ संकटांनी व्यापलेल्या संभाजीराजांना या जीवनातले सगळे विषय रस संपवून व चोखून खाल्लेल्या आंब्यासारखे रसहीन वाटत आहेत.

**संभाजीराजे व कवी कलश (एक साहित्यिक अनुबंध) :**

आजपर्यंतच्या नवनवीन संधोधनानंतर ही गोष्ट सिद्ध झालेली आहे की, छत्रपती संभाजी दुराचारी, दुष्ट असे शासक नव्हते. उलटपक्षी ते एक सुयोग्य राजनीतिज्ञ, धुरंधर, पराक्रमी तसेच स्वधर्म व परधर्माच्या खऱ्याखुऱ्या अनुयायांचा आदर व अत्यंत स्वाभिमानी होते. साहित्यातील अंत:साक्षीनुसार (त्यांचाच ग्रंथ 'बुधभूषण' व या तीन हिंदीकाव्यानुसार) ते काव्य साहित्य पुराणगीत कोदंड विद्यार्णव पारगामी होते. (पाहा त्यांची आत्मथोरवीबद्दलचे प्रगटीकरण बुधभूषण श्लोक नं.१५ अध्याय १) पूर्वग्रहदूषित दृष्टिकोनापासून त्यांच्याकडे पाहणे हे पूर्णांशाने अन्यायकारक आहे.

ही गोष्ट स्पष्ट व प्रसिद्धच आहे की, संभाजीराजे यांचे काव्यगुरू कवी कलशच होते. स्वत: कवी कलश हे हिंदीभाषी होते व ते हिंदीचे उत्कृष्ट कवी होते. एकाच वेळी अनेक अवयवांचे वर्णनासाठी सामूहिक रूपसौंदर्य मिश्रबंधू-विनोद यांनी उद्धृत केलेल पद

**''अंग अरसौहें छवि, अधरन सोहै चढि**
**राजे रद मंडली कपोल मंडली में मानो।**
**रुप के खजाने पर मोहर मनोजकी''**

आपण पुनरुक्तीचा दोष पत्करत अभ्यासले पाहिजे. किमानपक्षी हिंदी साहित्यातील थोर अभ्यासक, संशोधक व पुणे विद्यापीठाचे हिंदी विभागाचे प्रथम अध्यक्ष आणि सागर विश्वविद्यालयाचे वाङ्मय विद्याशाखेचे अधिष्ठाता महामहीम कै. डॉ. भगीरथजी मिश्र यांच्या काटेकोर मार्गदर्शनाखाली काम केलेले डॉ. कृष्ण दिवाकर यांनी आपल्या 'भोंसला दरबार के हिंदी कवी' या प्रबंधात (पृ.४५९) या पदातील चार ओळी मधुर शैलीचे उदाहरण देतांना उद्‌धृत केल्या आहेत. त्या पुन:श्च पाहूया.

**आछी छबि छकि मंदमंद मुसकान लागी।**
**विचल विलोकि तन,भूषण के फौज की ।।**
**राजे रद मंडली, कपोल मंडली में।**
**मानो रूप के खजाने पर मोहर मनोजकी ।।**

प्रौढा नायिकेचे हे कवी कलशकृत वर्णन मिश्रबंधू ह्याशिवाय अन्यत्र मला श्रीशंभूच्या नायिकाभेद ग्रंथाचा अनुवाद करतानाही प्राप्त झाले. त्या सर्व आठ ओळींचे हे कवित्व जिज्ञासूंनी नायिकाभेद या विभागाच्या नंतर अर्थासह पाहावे. प्रस्तुत प्रसंगी मधुर शैलीचे उदाहरण म्हणून दिल्यानंतर या शैलीसंबंधीचे संशोधक डॉ. कृष्ण दिवाकर यांनी मधुर शैलीचेच निरुपण केले आहे. या शैलीच्या अंतर्गत मधुर आणि संगीतमय उपनागरिका वृत्तीचा प्रयोग करून सुकुमार व कोमल भावांचे वर्णन केले जाते. त्यात कर्कश, भयानक, बीभत्स इ. प्रसंगांच्या वर्णनास स्थान नसते. राजै रदमंडली कपोल मंडली में। मानो रुप के खजाने पर मोहर मनोजकी इ. उल्लेख अलंकाराचे उदाहरण आहे. नृपशंभूच्या भक्तीभावनेचे उत्तम उदाहरण आपणास मिळते.

**६. गनिकहि तारे ओर पापिन उधोर खल,**
**रावन से मारे सुन कहाँ लौ वषानिए।**
**द्रौपदी की लाज राषि, गज को गोहारी करि,**
**दीनबंधु कहै सब वेदन में जानि ऐ।**
**हेमपुर दीन्हो ऐसे दरिद सुदामा हूँ को,**
**ऐसे प्रभु छाँडि ओर काहि उर आँनिए।**
**कीजिए सहाइँ मेरी सीतावर टेरी कहौं,**
**औगुन कछुक मेरे मन में न माँनिए।।३०।।**

**अर्थ :** हे प्रभू, आपण गणिकांना(पिंगला) तारले व पापिकांचा उद्धार

केला. रावणासारख्या दुष्टांचा संहार केला, याबद्दल किती वर्णन करावे? द्रौपदीची लाज राखली. गजेंद्राची पुकार ऐकली. या सगळ्या दुःखहरण करणाऱ्या (गरिबांच्या) बाबींमुळे आपणास दीनबंधू अशी उपाधी दिली जाते. सुदामासारख्या दरिद्र भक्तास आपण सुवर्णनगरी दिली. अशा प्रभूला सोडून मी आणखी कुणाची अंतःकरणात प्रार्थना करू? हे प्रभू, रामचंद्रजी प्रमाणे कृष्णावतारी मी आपणास मोठ्याने (धावा करून) पुकारत आहे. माझे काही अवगुण असलेच तर ते मनात धरू नका. येथे देवरति (प्रेम) हा स्थायीभाव आहे. ईश्वर आलंबन तर स्वयं कवी नृपशंभू आश्रय आहे. दीनबंधुता व दानशीलता हे उद्दीपन भाव आहेत. प्रार्थना अनुभाव आहे. खरे तर शांत रसाकडेच झुकणारा 'सातशतक' हा ग्रंथ आहे. शृंगाराच्या माथा पाय ठेविजे अशी त्यांची विरागी वृत्ती या छोटेखानी व बहुगुणी सात्त्विक ग्रंथात प्रगट होते.

OOO

**परिशिष्ट : १**

**प्रारंभापासून शेवटपर्यंत 'सातशतक', शांत रसाचेच भक्ती** प्रमुख आत्मिक व आत्मनिर्भय काव्य आहे. खरे तर भक्तिभावानेच ओथंबलेला हा छोटेखानी ग्रंथ आहे. **'भक्ती करे कोई सूरमा जाति बरन कुल खोय'** या कबीर वचनाप्रमाणे ही शूरवीरांची मनोगाथा आहे. विनयामुळे "तुमसों खरो कौन मोसो-खोटो।" "तुमसो बडो कौन मोसो-छोटो।" हे लिहिणाऱ्या तुलसीदासांच्या धरतीवर (विनयपत्रिका) हे सातशतक आहे. वस्तुःत ही शंभूराजांची विनयपत्रिकाच आहे. आत्मनिवेदन परमेश्वरापुढील असल्याने **"मोसो कौन कुटिल-खल कामी"** असे फार विनम्रपणे लिहिणाऱ्या सूरदासांचाही प्रभाव तुलसीदासांच्या प्रमाणेच येथे आपणास दिसतो. यातील बालपण व तरुणपणाच्या विनम्र निवेदनामुळे ते लौकिक अर्थाने खरे धरायचे नसते. शंभूप्रेमी या काही पदवाचनाने दचकतील. काहींना हे काव्य त्यांचे नाहीच असा भावही होणे शक्य आहे. पण स्थळ, काळ, वेळ व भावसंदर्भाने हे काव्य संयुक्तिक वाटेल तसे ते आहेच असे आजपर्यंतच्या त्यांच्या सर्व अभ्यासकांचे एकमत आहे.

आम्ही उद्धृत केलेल्या १०/११ पदाशिवाय आणखी पदे प्राप्त झाल्यास ही बाब आणखी स्पष्ट होईलच.

OOO

**परिशिष्ट : २**

**कवी कलश व छत्रपती संभाजी महाराज**

कवी कलश हे इ.स. १६६६ च्या पूर्वीपासून छ. शिवाजी महाराजांच्या दरबारात होते याबद्दलचा ऐतिहासिक उल्लेख जयपूर राज्याच्या ऐतिहासिक दफ्तर संग्रहातून प्राप्त लिहिलेले आढळते. या पत्रलेखकाने कवी कलश यांच्याबरोबर कायस्थ गृहस्थ सक्सेना यासही शृंखलाबद्ध केल्याचे वर्णन आहे. औरंगजेबाच्या शिपायांनी शिवाजीराजे आग्र्याहून निसटल्यावर त्यांचा ठावठिकाणा लावण्यासाठी त्यांना (या दोघांना) पकडल्याचे उल्लेख आहे. छ. शिवाजीराजांनीच त्यांना संस्कृत तसेच पुराण इ. शिकविण्यासाठी नियुक्त केल्याचाही संदर्भ मिळतो. वा. सी. बेंद्रे यांनी आपल्या छत्रपति संभाजी महाराज (प्रथम संस्करण) या ग्रंथात अलाहबादला काही दिवस विश्वासपूर्वक ठेवल्याचे म्हटले आहे.

काफीखानने लिहिलेल्या ग्रंथात या दोघा गुरुशिष्य, राजा-प्रधान अमात्य यांच्या संदर्भातील औरंगजेबाच्या दरबारातील, संपूर्ण शरीर शृंखलाबंद केलेल्या अवस्थेत 'जीभ व नेत्रांचा' फक्त उपयोग होऊ शकत होता.

**"तुअ तप तेज निहार के, तखत तज्यो अवरंग।"**(तुझे तप व तेजस्विता पाहून औरंगजेब तख्तावरून उठल्याची फार फार मनोवेधक पंक्तीने) अपमानास्पद मृत्यूपूर्वी आपल्या राजास गौरविले आहे.

राज्यव्यवहार, साहित्य व्यक्तिमत्त्वात असाधारण असे श्री कलशांचे स्वरूप होते; परंतु दुर्दैवाने (देशाच्या व विशेषत: पूर्वीच्या महाराष्ट्राच्या) मराठी यच्चावत साहित्यिकारांनी (इतिहासकारांनी देखील) छ. संभाजीराजांच्या प्रमाणेच पूर्वग्रह दूषित वृत्तीने ही दोन्हीही चरित्रे चितारली. पण अलीकडील जोधपूरकडील अजितोदय या महाराणा अजितसिंह, संभाजीकालीन ऐतिहासिक पत्रसारसंग्रह (संपा. शं. ना. जोशी), कादंबरीकार शिवाजीराव सावंत, विश्वास पाटील तसेच कोल्हापूरचे इतिहासमर्मज्ञ डॉ. जयसिंगराव पवार तसेच दक्षिण भारतातील मराठीचे गाढे संशोधक कै. वा. सी. बेंद्रे, डॉ. कमल गोखले यांच्या संशोधनामुळे बराच न्याय वरील उभयतांना मिळत आहे.

हेतुपुरस्सर केलेल्या सर्व लिखाणाचे पाणी सत्याच्या पुलाखालून वाहत जात असले तरी अद्याप 'दूध का दूध और पानी का पानी' करणे राहून गेलेले आहे.

कवी कलश यांची सरकारी मुद्रा अलीकडे उपलब्ध झाली आहे. त्यावरून त्यांची प्रगाढ विद्वत्ता, परामई दातृत्व, राजनिष्ठा इ. गुण प्रगट होतात.

**विधिरर्थि मनीपाषाणामवर्धिनयवर्त्मनाम् ।**

**शेवधिः सर्वसिद्धीनां मुद्रा कलश हस्तगा ।।**

**अर्थ :** कलशांच्या हातातील अंकित असलेली ही मुद्रा दीनजनांच्या इच्छांना पूर्ण करणारी आहे. ती मनीषियांना (बुद्धिवंतांना) शुभ संधी (अवसर) प्रदान करणारी आहे आणि समस्त शुभ योजनांचे उगमस्थान (निर्मितरक्षणे आहे.) स्वतः बरेचसे पंडितग्रस्त असूनही इतिहासकार गो. स. सरदेसाई यांनी 'मराठ्यांचा नवीन इतिहास'(या प्रथम आवृत्तीमध्ये) मध्ये कवी कलशांच्या आज्ञापत्र-धर्माभिमान, कर्मकांडपरायण, दैवतैकनिष्ठाग्रा-हिताभिमान, सत्यसंघ, समस्त राजकार्य धुरंधर, विश्वासनाधी, कविकलश छंदोमात्य या सहा सप्तविशेषणात्मक उपाधींचा संदर्भ दिला आहे. तो नक्कीच फुकाचा नाही. छ. संभाजीराजांनी त्यांच्यासाठी नवीन प्रधानपद निर्माण करून त्यांना छंदोगामात्य (वेदशास्त्र पारंगत अमात्य) हे विशेष नामकरण करून सन्मान केलेला होता. परंतु हेच पद अन्य ईर्ष्याळू व मत्सरी मंत्र्यांना नेहमी खटकत(बोचत) असे. त्यातूनच या शक्तिपूजक गुरू-शिष्यांवर महान आपत्ती कोसळली. संगमेश्वरास विविध दु:शक्तींचा समन्वय होऊन ते उभयता कैद झाले व ११ मार्च १६८९ च्या अमावास्येच्या दिवशी तुळापूर-वढू या जोडगावात अत्यंत हृदयद्रावक अवस्थेत मृत्यूच्या अधीन झाले. महाराष्ट्र व भारताचे सिंह-स्वामी कलिकालकवलीत झाले.

या गुरू-शिष्य किंवा राजा-अमात्य या अद्‌भुत जोडीबद्दल पूर्वग्रहदूषित अभ्यासकांबद्दल काय लिहावे? फार भले भले यात आहेत. यावेळी देववाणीतील श्लोक समोर आला.

दुर्जनः परिहर्तव्यो, विद्ययालंकृतोऽ पि सन् । मणिना भूषितः = सर्पः किमसो न भयंकरः ।। विद्येने आभूषित झालेले असले तरी दुर्जन (वृत्तीच्या) भावाच्या माणसांपासून दूर राहावे. सुवर्णमण्याने भूषित असलेला साप भयंकर नसतो काय? विसाव्या शतकात मान्यता मिळालेल्या गांधीजींची त्यांच्या उपस्थितीत व नंतरही भयंकर वावडे असलेले शेकडो हजारो भारतीय होते व आहेत. त्यातलाच हा प्रकार.

पण कालौघाच्या ऐरणीवर टिकल्याने त्यांच्या मृत्यूनंतर तेच काही

एकदम नॉडिंग पॉईंट (परिवर्तन बिंदू) साक्षात्कार झाल्यासारखे (बर्फाचे पाणी व पाण्याची वाफ झाल्यासारखे) काही पुन:श्च त्यांना धर्मवीर, शूराग्रणी, खरे सिंह इ. म्हणू लागले.

कलशांना कानामागून आला व तिखट झाला, असे बहुतेक तत्कालीन मंत्री समजत. कराल कलिकालाच्या प्रसंगात 'हिरा ठेवता ऐरणी-वाचे मारिता जो घणी' या संत तुकारामोक्तीच्या निकषावर इतर सर्व विरोधकांचा काचेचा चुरा समोर आला. संत कबीरांच्या सुरव्यात दोह्याचे प्रत्यंतर या एकेकट्याने सर्व दिवाभितांना सामोर जाताना आले.

**सिंहों के नहीं लेहंडे, रत्नों की नहीं बोरियाँ।**
**हंसो के नही पातियाँ, साधु न चले जमात।।**

सिंहाच्या झुंडी नसतात, रत्नांच्या (अनमोल) मोठमोठ्या गोण्या नसतात. हंसांच्या पंक्ती नसतात व साधू जमावाने चालत नसतात. त्यांच्या विलक्षण मृत्यूप्रसंगातील स्वत: कलशांनीच केलेले वर्णन आणखी बोलके आहे. स्वत: आलमगिरानेच त्यांना पाहिल्यावर ताजीम दिली.

**राजन हो तुम साँचे, खूब लडे तुम जंग**
**तुव तप, तेज, निहार के तखत त्यजत अवरंग।।**

हाच दोहा डॉ. जयसिंगराव पवार पुढीलप्रमाणे आपल्या 'छ. संभाजी'त उद्धृत करतात.

**यावन रावन की सभा, संभू बंध्यो बजरंग।**
**लहू लसत सिंदूर सम। खूब ख्येलो रनरंग।**
**ज्यों रवि छबि लखत ही, खद्योत होत बद रंग।**
**त्यो तव तेज निहारी के तरवत तजो अवरंग**

सिंदुराने लाल झालेल्या बजरंग बलीप्रमाणे शंभूरूप पाहून सूर्यास पाहून काजवा चमकला. प्रभावहीन होऊन तख्तावरून (सिंहासनावरून) खाली उतरून मसनदीवर ताजीम देण्यासाठी आला. यवनकाळ रावणाच्या सभेत सिंदुराप्रमाणे लालेलाल झालेले शंभुराजा (क्रौधार्याने झालेला) हनुमान बंदिवान अवस्थेतील प्रमाणेच तो शोभत होता.

खरे तर कवी कलश हा स्वतंत्र संशोधन व अभ्यासाचा विषय आहे. संभाजीराजांच्या नंतर छ. राजारामांनी त्यांच्या मुलास तंजावरला असताना स्वतंत्र जहागिरी देऊन आपल्य पदरी ठेवले होते.

मराठीतील जाणते साहित्यकार व इतिहासप्रेमी विलक्षण शिक्षणतज्ज्ञ श्री. वि. द. घाटे, हे कवी कलशांचे फार कौतुक करीत असत. त्यांच्या गोड व लाघवी रसाळ हिंदी भाषेमुळे, सारे अन्य मंत्री त्यांना गैरसमजाने 'गोडबोल्या' व धोकेबाज समजत. छ. संभाजीराजांना ते अंत:करणापासून आवडत असल्याने अन्य मंत्र्यांना स्वाभाविकच त्यांच्याबद्दल मनात ईर्ष्या (व म्हणूनच द्वेष) असे. वस्तु:त कवी कलश हे छ. शिवाजीराजे यांचा शोध होता. युवराज शंभूबरोबर ते आग्रा मुक्कामी ही होते. तहात इमाने इतबार छ. संभाजी यांची साथ देणारी जी अति निवडक मंडळी (उदा. हंबीरराव, महालोजी घोरपडे बऱ्याच अंशी हरजीराजे महाडिक, महाराणी येसूबाई) प्राणपणाने व प्रामाणिकपणे साथ देणारी होती. त्यात कवी कलश नि:संशय राहिले. कराल कलिकालाच्या कसोटीवरही ते शेवटपर्यंत राहिले. श्रीराम-हनुमान, कृष्ण-अर्जुन किंवा अशाच अट्ट (नानक-मर्दाना) स्वामी सेवक यात त्यांचा अंतर्भाव इतिहाससाक्षीने झाला आहे. मृत्यूच्या महामंदिरापर्यंत धीरगंभीरपणे उदात्त साथ देणारे अचल-अढळ व्यक्तिमत्त्वाचे उदाहरण म्हणून इतिहासात ते अमर आहेत. शिवोत्तर महाराष्ट्राचा नभांगणीचा शुक्रतुल्य ताऱ्याची आठवण (शंभूस्मरण) होताच कलशांचीही प्रभाकांती त्यात मिसळली असल्याची जाणीव जाणकारास होतच राहणार. असे साक्षीदार ही शिव-शंभू काळाची खासियत आहे.

बहुभाषा पंडित (संस्कृत-हिंदी-उर्दू-मराठी-कानडी इ. द्रविड भाषा तसेच इंग्रजी, पोर्तुगीज व डच इ.) संभाजीराजे यांचे पांडित्य, छंदोगामात्य कलशांच्या शुक्ल पक्षातील चंद्राप्रमाणे दिवसेंदिवस वाढतच होते. कुटिलांच्या कारस्थानांनी ते काळवंडले नाही.

**आली जरी कष्ट-दशा अपार, न टाकिती धैर्य तथापि थोर।**
**केला जरी पोत बळेची खाले, ज्वाळा तरी ती वरती उफाळे ॥**

या काव्यपंक्तीचे जीतेजागते उदाहरण या अमरजोडीने इतिहासात चिरकाल नोंदवून पुढीलांच्यासाठी मानदंड करून ठेवले आहे.

कवी कलशांचे मूळ नाव केशवभट्ट होते, असे रियासतकारांचे मत आहे. श्री. तामसकरांनी त्यांचे नाव उमाजी पंडित मानले आहे. श्री. राजवाडे हे त्यांचे नाव कलशच असल्याचे प्रतिपादन करतात. कोशकार चित्राव याच नावाची विविध रूपांतरे कबजी, कबकलश इ. मानतात. डॉ. गोडे त्यांचे मूळ नाव कृष्ण पंडित प्रतिपादतात. मूळ नावाच्या गौडबंगालातून बाहेर पडत

त्यांचे असाधारण व्यक्तिमत्त्व राजकारण व साहित्यात कवी कलश म्हणूनच ख्यात झाले. त्यांची कुलमुख्तियारी इतरांना सतत बोचत होती. वस्तुत: संभाजीराजांप्रमाणेच कवी कलशांचेही पुनर्मूल्यांकन करणे फार जरूर आहे. डॉ. जयसिंगराव पवार यांच्या **छत्रपती संभाजी** या स्मारक ग्रंथात प्रा. डॉ. वसंतराव मोरे, डॉ. वसंतराव कदम व स्वत: संपादकाची अभ्यासू प्रस्तावेनतील या संबंधांचे विवेचन तसेच डॉ. यादव गुजर यांनी शोधलेला

**'यावन रावन की सभा, संभू बंध्यो बजरंग।**
**लहू लसत सिंदूर सम, खूब खेल्यो रनरंग।**
**ज्यों रवि छवि लखत ही खद्योत होत बदरंग।**
**त्यों तुव तेज निहारी के तखत त्यजो अवरंग।।'**

या पदाच्या अन्यत्र अभ्यासकांच्या विवेचनात संदर्भ आलाच आहे. जिज्ञासूंनी या ३/४ अभ्यासकांबरोबर पूर्वाभ्यासक सर्वश्री बेंद्रे, डॉ. कमल गोखले यांचेही Waive Lenth of Thinking (विचार विलसितांच्या लाटा) यांच्या संशोधनासह जाणल्या पाहिजेत. अलीकडे खूप धडपड करून जमवलेले डॉ. सदाशिव शिवदे यांचे, रामदास व त्यांच्या परंपराभिमुख मताला घट्ट पकडून (जो ज्या मति सापडला ते त्या श्रेष्ठ) व आरोपीच्या पिंजऱ्यात कलशांना ठेवून केलेले विवेचनही मुद्दाम वाचावे. न्यायदेवतेप्रमाणेच, इतिहासदेवताही किती ठार आंधळीच असते याचे प्रत्यंतर, ''कलौ वेदान्तिन: सर्वे-फाल्गुनबालका : इव'' प्रमाणे हमखास साधारण माणसासही येते. ''मैं १४ आनेमें सारी दुनिया दो आने में,'' ही धारणा इतिहासप्रेमीत तरी नको.

OOO

**परिशिष्ट : ३**

**बुधभूषणची पडछाया या तीनही (हिंदी) ग्रंथावर :**

विविध वंदना **१: गणेश**

अ) तं नमामि भवबालकरत्नम्।

(शिवपुत्रांच्या पुत्ररूपी बालकरत्नास (गणेशास) मी वंदन करतो.)

अ) 'नखशिख'मधील प्रथम गणेशवंदना।

*पद पद्म पत्रसमचरन जंघ जिभी कनककर मकर।*

............................................

*ग्यान होत अग्यान के, सो गननायक गुन पढत ।।१।।*

(गणेशांचे पाय कमलपत्राप्रमाणे व मांड्या सोनेरी मोठ्या माशाप्रमाणे असणाऱ्या इ. इ. व अज्ञानी जनास ज्ञान देणाऱ्या गुण समजावणाऱ्या गणनायकाचे वंदन)

२) सरस्वती

*ब) तव करकमलस्थां स्फाटिकीं अक्षमालाम्।*

*........................................*

*स भवतु मम भूत्यै, वाणि ते मंदहासः ।।४९।।*

आपल्या (तुमच्या) हस्तकमलामध्ये(हातात) स्फटिकांची माळ (चमकदार) शोभत आहे.........

त्या वाणीच्या देवतेचे हलके हसू माझे कल्याण करो.

ब) विधिप्यारी को ध्याइकैं (नखशिख पद नं.२)

ब्रह्मदेवाच्या प्रियेचे(सरस्वती मातेचे ध्यान करून इ.)

**३. भवानी माता (उमा)**

*क) १)स्फटिकरचित पीठे श्यामलांगी भवानीम्। (१)*

*................*

*................*

*भुवि भारती जलधिजानिलयं स्यात् ।।११।।*

ही संबंध ११ श्लोकांची भवानी वंदना पुनःश्च पाहा. योगायोगाने याच ग्रंथात 'नखशिख' प्रकरणाच्या शेवटी ती अर्थासह बुध्याच दिली आहे. खास छ.संभाजीराजे कृत ही कुलदैवत व महाराष्ट्राची आराध्य देवतेची शाब्दिक महापूजा समग्र महाराष्ट्र व राष्ट्रप्रेमींनी जाणून घ्यावी.

*२) हरकण्ठ ग्रहानन्द मीलिताक्षीं नमामि उमाम्।(२)*

*कालकूट विषस्पर्श जातमूर्च्छागतां इव।।*

श्री शंकरांना आनंद देणाऱ्या व डोळे मिटवून घेणाऱ्या आणि त्यांच्या गळ्यातील कालकूट विषाने मूर्च्छित झालेल्या उमेस नमस्कार

*क).... भवप्यारी सिर नाई।।*

(श्री शंकरांच्या प्रियेस नमन करून)(नखशिखमधील प्रारंभिक दोहा)

४) श्रीकृष्ण

*१) पुंजीभूतं प्रेमगोपांगननाम्। मूर्तिभूतं, भागधेयं यदूनाम्।।*

*एकीभूतं गुप्तचित्रं श्रुतीनाम्। श्यामीभूतं, ब्रह्म मे सन्निधत्ताम्।।३६।।*

श्रीकृष्णाच्या रूपाने, गोपस्त्रियांचा स्नेह एकाकार झाला आहे. यादव कुळातील जनांचे भाग्य एकत्रपणे साकार(समूर्त) झाले आहे. सगळ्या श्रुतींचे(वेदांचे) अप्रगट रूप एकाकार झाले आहे. तर माझ्याजवळ सारे विश्व(ब्रह्मच) कृष्णाकाराने श्यामल रंगाचे रूप घेऊन उभे आहे.

१)..................................

*गुनवारे गुपालकी आँखिनते अरुझी सखियाँ सार तजावहिको ।।५ ।।*

गुणी गोपाळाच्या(श्रीकृष्णांच्या) डोळ्यात गुंतून त्या डोळ्यांच्या सरोवरात ते डुंबून गेले आहेत.

*२) गोकुल में अरि नंदलला। अबलान कों चौथिको चंद भयो है ।।७ ।।*

..गोकुळात हा नंदाचा आवडता बाळ, गौळणीसाठी (अबला) चतुर्थीचा चंद्र (दुर्मिळ)झाला आहे.

३) ..................................

*नँदलाल निहारी निहालभये। छबि कुंदन मालती बालनई ।।१४ ।।*

..................................

नंदलाल श्रीकृष्णजी भेटल्याने ती त्यांना पाहून खूश झाली. त्यावेळी तिची कांती (शोभा) कुंदफुलांच्या माळेसारखी प्रफुल्लित दिसू लागली.

*४) केलिके कुंज बजी मुरली। बुधि गोपवधूकी बंधी व्रजनाथ में ।।८ ।।*

शहाण्या गोपवधूला(राधेस) व्रजनाथजींच्या बंधनात कुंजवनात केली (क्रीडा) करण्याचा संकेत मिळाला.

*५) राधिका के परवालसें हाथन।लाल हरी घिरी लाली लुनाई ।।१५ ।।*

श्रीराधिकाजींच्या प्रवाळासारख्या लालचुटुक हातात श्रीलाल(श्रीकृष्ण) यांची सुंदरता वेढली गेली.

या दोन रीतिबद्ध काव्याशिवाय 'सातशतक' मध्येही एकाच वेळी 'गोपाल' व 'हरि' चा संदर्भ आला आहे. पाहा-

..................................

*संभ षोड़ महीपाल कहै सुनिए गोपाल।*
*हम हरि हाल तुम, सौ निहाल रहियुत है ।।२८ ।।*

शंभूराजे म्हणतात, गोपाल श्रीकृष्णा ऐक,"मी माझी सारी जबाबदारी तुझ्यावर सोपवतो."

या तीनही ग्रंथांतील वंदनामध्ये भगवान श्रीकृष्णांची त्यांची (शंभूराजांची)

भक्ती अधिक प्रगट होत आहे. बुधभूषणमध्येही ती ग्रथित आहेच. म्हणून अंगुलीनिर्देशनाने त्या आस्तिक वृत्तीचा व व्रजविहारी श्रीकृष्णच पुढे महाराष्ट्रात विठ्ठलरूपाने अवतरीत झाल्याचे आपण जाणतोच. अन्योक्ती विभागातील आम्रान्योक्तीतील रसहीन चोखलेल्या आंब्याची आठवण त्यांना 'सातशतका'त झाली आहे.

छ. संभाजीराजांची अनेक अवघड विपत्तींच्या राशीमध्येही इष्टदेवता भवानी व जनदेवता श्रीकृष्ण यांची भक्ती त्यांचा आस्तिकभाव आपणासमोर आणतो. याशिवाय ते परम शिवशक्तीचे उपासक होते हेही आपणास माहीत आहेच, पण या तीन ग्रंथांत ललितभाव व निर्वेदभाव(शांत रस) यांचा अंतर्भाव झालेला आहे. (बुधभूषणाच्या पुढील काळातील या चढत्या समाजाभिमुख व कसोटीच्या पायऱ्या होत.)

'सातशतक' हा या काव्यसंपदेतील कलशाध्याय म्हणता येईल.



**परिशिष्ट ४ :**

**हिंदी साहित्यातील 'नायिकाभेद' व 'नखशिख':**

आचार्य रामचंद्र शुक्ल यांच्या सुख्यात 'हिंदी साहित्य का इतिहास' मध्ये 'नायिकाभेद' ग्रंथाच्या दोन व 'नखशिख' च्या ११ ग्रंथांची यादी दिली आहे. ती पुढीलप्रमाणे :

**नायिकाभेद :**

| | |
|---|---|
| १) नायिकाभेद | (कवी गोकुलनाथ) |
| २) नायिकाभेद | (कवी गुमान मिश्र) |

**नखशिख :**

| | |
|---|---|
| १) नखशिख | (कवी कुलपति) |
| २) नखशिख | (कवी चंदन) |
| ३) नखशिख | (कवी चंद्रशेखर) |
| ४) नखशिख | (कवी तोषनिधि) |
| ५) नखशिख | (कवी देवकीनंदन) |
| ६) नखशिख | (कवी नागरीदास) |
| ७) नखशिख | (कवी पजनेस) |

८) नखशिख (कवी बलभद्र मिश्र)
९) नखशिख (कवी सूरति मिश्र)
१०) नखशिख (कवी सेवक)
११) नखशिख प्रेमदर्शन (कवी देव)

कविश्रेष्ठ "देव" यांची 'नखशिख' व 'नायिकाभेद' नमुना पदे(आचार्य शुक्ल यांच्या इतिहासावरून)

'देव' मैं सीस बसायो सनेह सों, भालमृगम्मद बिंदु कै भाख्यों।
कंचुकी में चुपर्‍यो करि चोवा, लगाय लियो उर सों अखिलाख्यो।
लै मखतूल गुहे गहने, रस मूरतिवंत सिंगार के चाख्यो।
साँवरे लाल को साँवरो रूप, मैं नैनन को कजरा करि राख्यो।।
धार में धाय धँसी निरधार ह्वै, आय फँसी उकसी न धधेरी।
री! अँगराय गिरी गहिगी, गहि फेरे फिरी न घिरी नहिं घेरी।
'देव', कुछ अपनो बस ना, रस लालच लाल चितै भइँ चेरी।
बेगि ही बूड़ि गई पँखियाँ, आँखियाँ मधु की मखियाँ भई मेरी।।



परिशिष्ट : १

# सह्याद्रीचा सिंहनाद हा नृपशंभू राजा

## छ. संभाजीराजांच्या जीवनाचे सिंहावलोकन

| वर्ष | तारीख महिना आणि तिथी शक (संवत्सर) | ठळक घटना |
|---|---|---|
| १६५७ | १४ मे : ज्येष्ठ शु।। १२ हेमलंबी संवत्सरशके१५७९ | सुपुत्र संभाजींचा जन्म (गुरुवार घटिका १०) पुरंदर किल्ल्यावर. मातोश्री सईबाई सो. भोसले:पिताश्री शिवाजीराजे श. भोसले. |
| १६५९ | ५ सप्टेंबर: भाद्रपद१४ शके १५८१ | मातोश्री सईबाई सो. यांचे राजगडावर महानिर्वाण(निधन) |
| १६६१ | एप्रिल नंतर (शके१५८३) | शिवाजीराजांनी शिर्क्यांचे श्रृंगारपूर घेतले |
| १६६४ | | या दरम्यान पिलाजीराजे शिर्के यांची मुलगी राजसबाई(नंतर येसूबाई) हिचे बरोबर लग्न. |
| १६६४ | २३ जानेवारी, | शहाजीराजांचा कर्नाटकात होदिगिरी येथे मृत्यू. |
| १६६५ | १३ जून, | मराठे-मोगल पुरंदर तह. संभाजीस मोगलांची पंचहजारी मनसब. |
| १६६५ | जून ते सप्टेंबर, | संभाजीराजे मनसबदारी स्वीकारण्यास जयसिंहाकडे. |
| १६६५ | ५ सप्टेंबर, | संभाजींना मनसबीचे फर्मान |
| १६६६ | ५ मार्च(फाल्गुन शु.९) | आपल्या पित्यासह संभाजीराजे राजगडाहून बादशहा औरंगजेबाच्या भेटीस आग्र्याकडे रवाना. |
| १६६६ | ११-१२मे(वैशाख व.४) | औरंगजेबाचा दरबारसोहळा. आग्रा उपस्थित पिता-पुत्रांची बादशहाशी अनबन. परिणामत: उभयतास नजरकैद तरीही ता. १३ मे स औरंगजेबाकडून संभाजीस सरोपा, २ रत्नजडित खंजीर व एक मोत्याची माळ भेट. |

| | | |
|---|---|---|
| | २५ मे, | शिवाजीराजे बादशहाचे पक्के नजरकैदी |
| १६६६ | १७ ऑगस्ट, श्रावण वद्य१२ | शिवाजी व संभाजी गनिमीकाव्याने आग्र्याहून सटकले. संभाजी बनारस अलाहबादकडे कलशांच्या मदतीने एका गुप्तस्थळी. |
| १६६६ | २० नोव्हेंबर, (मार्ग.शु. ।।५) | शंभुराजांचे राजगडावर आगमन |
| १६६७ | ऑक्टोबर नोव्हेंबर, | शिवसूचनेनुसार शिवाजी व शहाआलम यांचा तह. यानुसार संभाजी पुनःश्च ४ हजार स्वारांचा मुगलांचा मनसबदार. या तहास बादशहाची १६६८ ला मान्यता. |
| १६६७ | ११ जुलै, | मिर्झाराजे जयसिंहाचा मृत्यू |
| १६६७ | ऑक्टोबर (२७ कार्तिक वद्य ५) | मोगलांचे मनसबदार म्हणून औरंगाबादला संभाजीराजांचे आगमन. |
| १६६९ | अखेर | दोन्ही बाजूंना अडचणीचा म्हणून तह संपुष्टात. |
| १६७० | फेब्रुवारी ४, | कोंडाणा किल्ला हस्तगत. तानाजी मालुसरे कामी आले. |
| १६७० | २४ फेब्रुवारी, फाल्गुन शुः१५ | सोयराबाईस राजाराम हा मुलगा झाला. |
| १६७१ | २६ जानेवारी, | संभाजी युवराज म्हणून(१४ व्या वर्षी) पन्हाळगडवर राजधानी स्थापून स्वतंत्र कारभार सांगितला. स्वतंत्र लेखनिक दिला. भावी राजा म्हणून त्यांस शिक्षण. प्रत्यराज्याभिषेकापूर्वी सर्व प्रकारचे शिक्षण व अन्य तजवीज. |
| १६७२ | जानेवारी, | रामनगरच्या मोहिमेवर छ. शिवाजी राजांच्यासह संभाजीही आघाडीवर. |
| १६७२ | प्रथम मोहीम (स्वतंत्र) | सैन्याचे नेतृत्व देऊन गुजराथ व खंबायत मोहिमेवर रवानगी. या स्वारीत संभाजींने युद्धकौशल्य |

| | | |
|---|---|---|
| | | प्रगट केले. |
| १६७४ | एप्रिल-मे, | संभाजीकडे इंग्रज व्यापारी कंपनीची जबाबदारी दिली. |
| १६७४ | ६ जून (ज्येष्ठ १३) शु.१२ शके १५९५ | शिवाजीराजांचा राज्याभिषेक. सोयराबाई पट्टराणी तर युवराज्याभिषेक संभाजीचा मान |
| १६७४ | १७ जून: ज्येष्ठ वद्य ९ | मातोश्री जिजाऊसाहेब पाचाडला महानिर्वाण. |
| १६७४ | २४ सप्टेंबर, | छत्रपती शिवाजी महाराजांचा शिवधर्म विधीनुसार शिवराज्याभिषेक(दुसरा) |
| १६७५ | दुसरी मोहीम | संभाजीला आदिलशाहीवरील लढ्यात नेतृत्व देण्यात आले. |
| १६७५ | माघ वद्य ५ | संभाजीराजांची मुंज झाली. |
| १६७६ | ६ ऑक्टोबर, (अश्विन-विजयादशमी) | शिवाजीराजे कर्नाटक स्वारीवर. युवराज संभाजी शृंगारपूरला रवाना. सोबत उमाजी पंडित. |
| १६७६ | | राजापूर वखार संदर्भात-इंग्रजांशी तडजोडीचे काम संभाजीराजांवर |
| १६७७ | १ ऑक्टोबर १६७७ | इंग्रज आपल्या पत्रात 'संभाजी समंजस आहे' असे लिहितात. |
| १६७८ | २३ मार्च, | शृंगारपूरला कवी कलश, शिवयोगी व इतर तांत्रिक शक्ती उपासक यांच्या सहाय्याने संभाजीला कलशाभिषेक. |
| १६७८ | एप्रिल, | छ. शिवाजी महाराज दक्षिणचा प्रचंड दिग्विजय करून परतले. |
| १६७८ | सप्टेंबर, | संभाजीराजे-येसूबाई 'येसूबाईंना भवानीबाई मुलगी' (शृंगारपूरला) झाली. |
| १६७८ | ३ सप्टेंबर, (कार्तिक) | महाराजांच्या सांगण्यावर संभाजीराजे परळी किल्ल्याकडे रवाना. |
| | ३ डिसेंबर, (मार्गशीर्ष) | कृष्णा-वेण्णा संगमा(संगम मांहुली) वरून दिलेर खानाकडे रवाना |
| | १३ डिसेंबर, | कुरकुंभ येथे उभयतांची भेट |

| | | |
|---|---|---|
| | २८ डिसेंबर, | अष्टप्रधान मंडळातील मंत्री व आग्र्याचे साथीदार दत्ताजी त्र्यंबक (वाकनीस) यांचा मृत्यू |
| १६७९ | २ एप्रिल, | संभाजीसह दिलेरखानाने मराठ्यांच्या मुलुखातला भूपाळगड घेतला. |
| | २१ डिसेंबर, | मोगलांकडून निसटून, विजापूरच्या मसूदखानाच्या मदतीने संभाजीराजे पन्हाळगडावर. |
| १६८० | १३ जानेवारी, | शिवाजी व संभाजी यांची पन्हाळ्यावर भेट. |
| | ३ एप्रिल चै.शु.१५ | छ. शिवाजीराजे रायगडी कालवश. हे वृत्त संभाजीराजांना कळविले नाही. |
| | २१ एप्रिल, | १० वर्षांच्या राजारामाचे मंचकारोहण. त्याच दिवशी |
| | अक्षयतृतीया. | मोरोपंत, अण्णाजी दत्तो पन्हाळ्याकडे संभाजीराजांच्या बंदोबस्तासाठी प्रस्थान. पण अण्णाजी दत्तो यांना हंबीररावांकडून कऱ्हाडनजीक कैद. |
| | २७ एप्रिल, | संभाजीने पन्हाळाहून राज्यकारभारास सुरुवात |
| १६८० | १८ जून, | संभाजीराजांचे रायगडावर आगमन. सिंहासन ताब्यात |
| | २७ जून (श्रावण एकादशी) | पुतळाबाई सती गेल्या. |
| | २० जुलै (नागपंचमी) | संभाजीराजे मंचकारोहणस्थ. |
| १६८१ | १६ जानेवारी, (१४-१५)माघ शु.७ शके १५०२. | संभाजीराजांचा रायगड येथे विधियुक्त राज्याभिषेक महाराजांचे दुसरे छत्रपती म्हणून सर्वमान्य. रायगडावर. प्रचंड समारंभ. |
| | ९ मे. | औरंगजेबपुत्र शहाजादा अकबर हा दुर्गादाससह संभाजीराजांच्याकडे आश्रयार्थ. |
| | १० जून-१७ जून, | नेताजी पालकर व हिरोजी फर्जंद यांना संभाजीराजांतर्फे पाली गडावर अकबराच्या भेटीसाठी पाठविले. |
| | ऑक्टोबर, | शाहजादा आजम(औरंगजेबाचा तृतीय पुत्र) अकबरास पकडण्यासाठी बऱ्हाणपूरहून रवाना. |

| | | |
|---|---|---|
| | १३ नोव्हेंबर, | संभाजी व अकबर यांची पादशाहापूर (पाली-धोंडसे) येथे भेट. बरोबर दुर्गादास . |
| १६८२ | २२ जानेवारी, माघ व ।।९ शके | रामदासाचा मृत्यू. |
| १६८३ | २२मार्च, | औरंगजेबाचे औरंगाबादला आगमन |
| | गुरुवार १८ मे, | संभाजीराजांस पुत्ररत्न. गंगोली येथे येसूबाईच्या पोटी |
| | वैशाख व ।।७, | शिवाजी नामाभिधान. दुसरा शिवाजी (सातारा शाहूराजे |
| | डिसेंबर, | संभाजीराजांचे अंबरच्या राजारामसिंहास पत्र. दिल्ली दरबारी धडक देण्याचे एक उत्तुंग धाडस. |
| १६८३ | जाने-फेब्रुवारी, | सुलतान-आजमशहा (औरंगपुत्र) कोल्हापूरपर्यंत. हंबीररावाने त्यास परतवले. |
| | सप्टेंबर-ऑक्टो., | औरंगजेबाचे अहमदनगरला आगमन. दिलेरखान पैगंबरवासी. |
| | १ नोव्हेंबर, | संभाजीराजांनी फोंड्यास वेढा घातला. येथे येसाजी कंक व कृष्णाजी कंक (येसाजी पुत्र) यांचा पराक्रम. मागील महिन्यात सांतो, एस्तिवो गड वेढून पादाक्रांत झाल्यावर गोव्यातील साष्टी व बारदेशावर हल्ला. |
| | २३ डिसेंबर, | कवी कलश यांना कुलमुखत्यारपद. |
| १६८४ | ७ जानेवारी, | भीमगडाच्या झाडीत कवी कलशचा अकबराच्या साथीने फिरंग्यांशी तह. |
| | १५ जानेवारी, | शहाआलमने डिचोली(गोवा)शहरास उद्ध्वस्त केले. |
| | १८ जानेवारी, | आक्वाद किल्ल्यावर(मांडवीच्या तोंडावर) १२० तख्यांचे औरंगजेबाचे आरमार. |
| | १८ मे, | रोगराई व मराठ्यांचे छुपे हल्ले यांनी त्रस्त झालेला शहाआलम अहमदनगरला परत. |
| १६८५ | फेब्रुवारी, | बादशहाकडून सफुल्लाखानास खिल्लत व |

| | | |
|---|---|---|
| | | शिरवळकडे अकबरास आणण्यासाठी रवाना. |
| | ११ ऑक्टोबर, | कुतुबशहाकडे २ लाख होनांची खंडणी व २० कोटी रुपयांची पेशकश भरण्याचा बादशहाकडून आदेश. कुतुबशहाचा क्रोड देऊन बादशहाशी सल्ला. |
| १६८६ | १३ सप्टेंबर, | विजापूर औरंगजेबाचा विजय. अश्विन शु ॥३ |
| | १६ डिसेंबर, | बादशहाची गोवळकोंड्याकडे कूच |
| १६८७ | संवत१६०८, (फेब्रुवारी) | अकबर जहाजाने इराणकडे |
| | २७ सप्टेंबर, | गोवळकोंड्यांच्या कुतुबशाहीचा अस्त |
| | ऑक्टोबर, | सर्जाखानबरोबरील युद्धात हंबीरराव वाईजवळ धारातीर्थी. शंभूराजांचा खड्गहस्तच नष्ट. |
| १६८८ | ऑक्टोबर - नोव्हेंबर, | गणोजी शिर्के व कलश यांचा संघर्ष. कलशांचा पाठलाग. शिरकाण शिर्क्यांकडे. |
| १६८९ | १ फेब्रुवारी, | शिर्क्यांचे पारिपत्य करून संभाजीराजांचे संगमेश्वरला प्रयाण. |
| | ३ फेब्रु. ते ७फेब्रु., | मुकर्रबखान(शेख निजाम) ने संभाजी व कलशला बेसावध असताना रंगनाथ स्वामी या रामदासीच्या इ. सहकार्याने कैद केले. |
| | ९ फेब्रुवारी, | राजारामांचे येसुबाईंच्या संमतीने मंचकारोहण |
| | १५ फेब्रुवारी, | संभाजी व कलश यांना बादशहापुढे बहादूरगडला उभे. |
| | ९ मार्च, | संभाजीची वार्ता ऐकून हरजी महाडिक यांनी केसो त्रिमल यांस अटक. |
| | ११ मार्च, फाल्गुन अमावास्या | संभाजी व कलश यांचा तुळापूरजवळ वडू येथे हनन. |



परिशिष्ट : २

# छत्रपती संभाजीराजे यांची राजमुद्रा

**।श्री शंभो:शिवजातस्य, मुद्रा द्यौरिव राजते।**
**यदंकसेविनो लेखा, वर्तते कस्य नोपरि।।**

**अर्थात :** श्री शिवाजीराजे यांचे पुत्र श्री संभाजीराजे यांची ही मुद्रा आकाशाप्रमाणे शोभा देत आहे. तिचे अंकसेवन(स्वीकार) करणाराचा पगडा कोणावर पडणार नाही?

आजकाल नव्या सहस्त्रकाबरोबर आणि नूतन शतकाच्या सोबत त्यांच्या उष:कालात विचारांचीही नवी चाहूल महाराष्ट्र मुलखातही लागलेली दिसते. इतिहासाचे सूक्ष्म अवलोकन होत आहे. झोपलेला (निद्रिस्त) हरि हुंकार देऊ लागला आहे. विसाव्या शतकाच्या उत्तरार्धात आई जगदंबा तुळजाभवानी, जाणते राजे व रयतेचे पालनहार श्री शिवछत्रपती व त्यांची प्रतिपश्चंद्राच्या मुद्रेचा चांगलाच जागर झाला. क्षत्रिय कुलावंतस सिंहासनाधीश्वर शिवछत्रपती सह युवराज संभाजीराजे या छाव्याचे कोडकौतुक होऊ लागले. शंकासुरांचे मळभ दूर होत राहिले. श्री शिवाजीराजांसोबत युवराज व राजे संभाजी आपल्या समग्र ३३ वर्षांच्या भव्यदिव्य कालासह समोर आले. तसे तर कोसळलेल्या विजेप्रमाणे त्यांच्या मृत्यूची दखल संमिश्र भावात इतिहासकार व साहित्यिकांनीही घेतली होती. पण, नको त्या शंका-कुशंकांनी हा कृष्णमेघ घेरला होता. शेवटी महाकवी भवभूतींच्या भाकिताप्रमाणे काही समानधर्म इतिहासकार व साहित्यकारांनीही त्यांची यथोचित दखल घेतली. श्री वा. सी. बेंद्रे, डॉ. कमल गोखले, काहीसे सेतुमाधवराव पगडी व अलीकडे डॉ. जयसिंगराव पवार यांनी 'दूध का दूध पानी का पानी' करण्यात यश मिळविले. नवे अभ्यासक डॉ. शिंदे, महेश तेंडुलकर, घोरपडे आनंदराव यांनी व ख्यातिकीर्त कादंबरीकार शिवाजी सावंत व विश्वास पाटील यांनी साहित्यातील ताणा-बाण्यात या सिंहप्रकृती नरशार्दुलाचे महावस्त्र मराठी मायबोलीला प्रदान केले.

तरीही हा सारा किनाऱ्यावरचाच प्रवास असल्याचा भास सुजाण इतिहास रसिकज्ञात्यास वाटावा. शंभूराजांची संस्कृत जाण, प्राचीन राजधर्माची जाण

त्यांच्या 'बुधभूषण' ग्रंथानेच होते. हा तीन अध्यायांचा मौलिक हार मऱ्हाटा मुलखात लवकरच आम्ही अनुवादून उपलब्धही साक्षेपाने केला. जिजाई प्रकाशन, नारायण पेठ (पुणे ३०). पण काळाचा प्रभाव की काय कोण जाणे? शंभूमुद्रा शिवमुद्रेप्रमाणेच धीरगंभीर भावाने हळूहळू महाराष्ट्रासमोर आली. तिचा समावेश कानोसा व वसा नव्या पिढीने घेतलाच पाहिजे. म्हणूनच तिचा अंतर्भाव या सिंहावलोकनात केला आहे.

अनुष्टुभ छंदातील (श्लोक स्वरूपातील) षोडस (१६) कलांची सप्तपदी असलेली ही भव्यदिव्य राजमुद्रा आहे. आपल्या पूज्य पिताजींच्या पावलावर पावले ठेवून तिची निर्मिती झालेली दिसते. ती आकाशोन्मुख आहे. भव्य-दिव्यतेत ती तितकीच हृदयंग आहे. ही मुद्रा शिवमुद्रेप्रमाणेच प्रत्ययकारिणी आहे.

तिचे सप्तपदी स्वरूप व १६ कलांची न्याहाळणी नीट केल्यावर (त्या बारकाईने पाहिल्यावर व त्यांची मोजदाद केल्यावर) हे तिचे गूढभव्यत्त्व समोर येते. ते आपण पुन:श्च पाहूया.

| | |
|---|---|
| श्री | १ |
| शंभो:शिव | २ |
| जातस्य मुद्रा द्यौ | ३ |
| रिव राजतै ।। यदं | ४ |
| कसेविनो लेखा | ५ |
| वर्तते कस्य | ६ |
| नोपरि | ७ |

चंद्राच्या १६ कलांची तिला आकारभूषा आहे. चंद्राचे वर्धिष्णु(वाढते) सौंदर्य तीत आहे. ती स्पष्ट दृष्टिगोचर आहे. 'आकाशाप्रमाणे ती शोभत आहे' हे या मुद्रेचे घोषवाक्य आहे. या स्वरूपात केवढी प्रचंड व्यंजना(गूढ मतितार्थ) आहे! आकाश हे पंचमहाभूतांपैकी एक, पण खरे तर पंचमहाभूतांचेही ते प्राणतत्त्व कवेत घेणारे स्वयंभू असे आकारतत्त्व आहे. ते कमालीचे गूढ, भव्यदिव्य व उदात्त आहे.

संस्कृतात अमरकोशात व्योमवर्गामध्ये त्यास पुढील पर्यायी नावे आहेत.१)द्यो २)द्यौ ३)अभ्रम् ४)ब्योम ५)पुष्करम् ६) अम्बरम् ७) नभः ८) अंतरिक्ष ९)गगनम् १०)अनन्तय् ११)सुखर्त्म १२)खम् १३)वियत् १४)

विष्णुपदम् १५)आकाशम् १६) विहाय:

योगायोगाने त्यांची संख्याही सोळाच आहे. मराठी संतसाहित्यात आकाशाची भारीच मातब्बरी आहे. आकाशाचे पोटी चंद्रतारांगणे किंवा तुका आकाशाएवढा, म्हणून त्याला कवेतच घेतले गेले आहे. आभाळप्रेमींनी ती जाणल्यावर आकाश ठेंगणे वाटावे ''अणुरेणुया थोकडा। तुका आकाशाएवढा।।'' ही तुकोबारायांची सुरवात भाववाणी न आठवली तरेच नवल. 'आकाशे सर्वत्र वसावे' असे ज्ञानोबांनी त्याचे (आकाशाचे) थोडक्यातच वर्णन व यथोचित रूप दाखविले आहे. खरे तर ही 'स्वर्गोपम' मुद्रा आहे. ती आकाशाकडून स्वर्गाकडे अंगुलीनिर्देशन (बोट दाखविणारी) करणारी नाही का?

ही मुद्रा रायगडावरील मंचकारोहणापूर्वीच पन्हाळा गडावर सिद्ध झालेली दिसते. ७ मे १६८०(वैशाख वद्य ४ शके १६०२) रोजी मुरगुडच्या रुद्रप्पा देसाईला लिहिलेल्या पत्रावर ही त्यांची षोडषावली सप्तपदी मुद्रा प्रथम प्रशासकीय कारभारातच सुरू झालेली आढळते. पुनःश्च या देसायासच २८ मे ला त्याचवर्षी (१६८०) त्यांनी पत्र लिहिले आहे. त्यावर तिचे प्रगटीकरण आहे.

ती बालेकिल्ल्याप्रमाणे उंच, गूढ व भक्कम व दुर्गम पण नयनमनोहारी आहे. वनराज सिंहाप्रमाणे ती प्रभावी व वेळप्रसंगी प्रलयंकारीही बनवणारी आहे. महाराष्ट्राच्या प्रत्येक मानकऱ्याने तिला अंतःकरणातच ठेवली पाहिजे, ती आत्मानुरूप आहे. डॉ. शिवदे यांच्या बऱ्याचशा संकलनात्मक सामग्रीची दखल अभ्यासकांनी घेतली पाहिजे.

गीतेत वर्णिल्याप्रमाणे 'अमानित्त्व, अदम्भित्त्वम्' (अध्याय१३/७) असे तिचे स्वरूप आहे. शंभुराजे रचित भवानी स्तोत्रामध्ये हे स्तोत्र उच्चरवाने म्हणणाऱ्याचे व्यक्तिमत्त्व, समुद्रात उठणाऱ्या व आकाशाकडे झेपावणाऱ्या प्रभंजनाप्रमाणे होईल, असे राजांनी म्हटले आहे. १६ कलाबरोबर दक्षिणपायथी बुरुजाची आहे असे एक मत.



परिशिष्ट : ३

# भोसल्यांची साहित्यिक परंपरा

आपल्या या खंडप्राय महान भारत देशात संगीतादी अनेक कला हजारो वर्षांपासून उत्कर्ष पावलेल्या आढळतात. संगीत, नाट्य व नृत्य या कलांची आमची परंपरा इसवीसनाच्याही अनेक शतके आधी जाऊन पोहोचते. या कलामध्ये आमच्या देशातील प्रत्येक विभागाची काही वैशिष्ट्ये आहेत व त्या त्या प्रांताने ती नीट जोपासली व वाढविली आहेत.

उत्तरेमधील लखनौ–जयपूरकडील नृत्यपद्धती 'कथक' राजाश्रयाने वाढली. लखनौचे नवाब वाजीदअली शहा स्वत: उत्कृष्ट नर्तक व नृत्यशिक्षक होते. त्यांनी आपल्या दरबारी शेकड्यांनी नर्तक–नर्तकींना व नृत्याचार्यांना आश्रय दिला होता आणि 'कथक' नृत्याला उत्कर्षाप्रत नेऊन पोहोचविले होते. त्यांचे हे ऋण कोणीच विसरू शकणार नाही. तसेच पूर्वेकडील 'मणिपुरी' नृत्यपद्धतीला देखील तिकडील लोकांनी आपल्या जीवनाचे एक अभेद्य अंगच करून ठेवले आहे. ज्याला नृत्य करता येत नाही, तो जणू संस्कारशून्य अशीच तिकडील लोकांची समजूत आहे आणि यामुळेच राजापासून रंकापर्यंत सारे लोक कलादेवीच्या भक्तिरसात अगदी तल्लीन होऊन गेले आहेत. श्रीकृष्णाच्या व गौरांगप्रभूच्या प्रेमाने जणू सारा प्रांत आनंदसागरात न्हाऊन निघाला आहे. इकडे दक्षिणेकडे मलबारात कथकळी नृत्यपद्धतीदेखील राजाश्रयानेच पोसली. 'कोट्टारक्करा' राजाने 'रामनाट्टम्' म्हणून तयार केलेली नृत्यपद्धतीच आज 'कथ्थकली' या नावाने ओळखली जाते. कथ्थकली 'नृत्यनाट्या'मध्ये एकच कथा अखंड आख्यानरूपाने आजदेखील रात्र रात्र जागून सूर्योदयापर्यंत सादर केल्या जातात.

याचप्रमाणे दक्षिणेच्या पूर्व किनारपट्टीकडील नृत्यपद्धती 'कूत्तु,' 'आट्टम्,' 'दासीआटम्,' 'सदर कचेरी' अशा निरनिराळ्या नावांनी पूर्वी ओळखली जात होती. आज ती 'भरतनाट्यम्' या नावाने आपणासमोर आहे. या पद्धतीला हे नाव–

**भकारो भावनैर्युक्तो रेफो रागणे मिश्रित: ।**
**तकारो तालमित्याहुर्भरतार्थविचक्षणै: ।।**

या श्लोकाच्या अर्थानुसार दिले गेले असावे; परंतु भरताच्या नाट्यशास्त्राचा व या नृत्यपद्धतीचा तसा परस्परसंबंध काहीच नाही. अशा या 'भरतनाट्यम्'

शैलीला तंजावरच्या मराठा राजांनी आपल्या कला प्रेमाने जोपासली व वाढवली. राजदरबारापासून देव दरबारापर्यंत या नृत्यपद्धतीने अबालवृद्धांची मने मोहून टाकली आणि आजदेखील या नृत्यशैलीचा डंका सर्व जगभर गाजत आहे.

याचप्रमाणे उत्तर, पूर्व, दक्षिणा या तीनही दिशा आपल्या कलानंदात मग्न असताना पश्चिमेस महाराष्ट्र मात्र मुलूखगिरीत मश्गुल होता. राजकीय उलाढालीत त्याला ऐषआरामासाठी मुळीच उसंत लाभली नाही आणि त्यामुळेच हा प्रांत शास्त्रीय नृत्यकलेला मुकला होता, असे आपण आजपर्यंत समजत आलो; परंतु तो समज चूक आहे. हेच हा कलासंपन्न मराठ्यांचा इतिहास आपणास सांगेल.

श्री. शहाजीराजे भोसले यांच्या दुसऱ्या पत्नी 'तुकाबाई' यांचे चिरंजीव व्यंकोजीराजे भोसले हे तंजावरचे पहिले राज्यकर्ते. नायक राजानंतर इ.सन १६७५ पासून इ.सन १८५५ पर्यंत एकंदर बारा मराठी राजांनी त्या प्रांतावर राज्य केले. या मराठ्यांनी त्या देशावर फक्त राजसत्ताच गाजवली नाही तर लोकांच्या एकूण सामाजिक व सांस्कृतिक जीवनात फार मोलाची भर घातली. या राजपरंपरेने वैद्य, गज, अश्व, काम, ज्योतिष, पुराणे, कहाण्या, गीते, संगीत, नाट्य, नृत्य इत्यादी विषयांवर तामीळ, तेलुगू, मराठी, संस्कृत, मोडी, हिंदी इत्यादी भाषांमध्ये लिहिलेले अनेकानेक ग्रंथ आजदेखील उपलब्ध आहेत. आज आपण पाहात असलेली भरतनाट्यम् नृत्यपद्धती मराठी राजांनीच जोपासली व वाढविली. त्यांनी तेथील स्थानिक कलावंतांच्या कलेला प्रोत्साहन देऊन त्यांना थोर पंडितांकडून शिकवून आपल्या राजप्रांगणात त्यांच्यासाठी स्वतंत्र असे नाट्यगृह 'संगीत महाल' बांधून देऊन त्यांच्या गुणांचे कौतुक केले. तंजावरमध्ये आजही ते नाट्यगृह लोकांच्या समोर उभे राहून जुने वैभव सांगत आहे, त्यांच्या उपयोगी पडत आहे.

तंजावरची ही राजपरंपरा पराकाष्ठेची कलाविद होती. त्यातील अनेक विविध प्रकार रागा तालात बांधले आहेत. राजा सरफोजीने अनेक नृत्यमालिका (निरुपणे) लिहिल्या आहेत. त्या नृत्यमालिकांमध्ये एकाच रागात व तालात १९ पर्यंत वेगवेगळे प्रकार रचून त्यांत एकच कथा गुंफली आहे जणू एकपात्री नृत्यनाट्यच की काय, असे वाटते. आज अस्तित्वात असलेल्या, 'भरतनाट्यम्' पद्धतीमधील बरेच प्रकार यातील प्रकारांशी मिळतेजुळते असले

तरी त्यात कोणतेच असे एक कथासूत्र पाहावयास सापडत नाही. मराठा राजांनी लिहून ठेवलेले हे नृत्यावरील ग्रंथभांडार आज 'तंजावर महाराज सरफोजींचे सरस्वती–महाल वाचनालय' (Tanjavar Maharaj Serfoji's Saraswati-Mahal Library) येथे संकलित आहे. ज्या काळी मराठ्यांच्या रणनौबत उत्तरेत गर्जत त्याच काळी मराठ्यांच्या नृत्यकलानौबती देखील दक्षिणेत दणाणत होत्या, हेच या वाचनालयातील पुरातन ग्रंथ आपणास आवर्जून सांगितले. या वाचनालयातील नृत्यसाहित्य तामीळ, तेलुगू, जुनी मोडी व तांजोरी मराठी या भाषांमध्ये विखुरलेले आहे. आज त्याला कोणी त्राता राहिलेला नाही. ते आज तेथील कोठल्या तरी सांदी कोपऱ्यात, प्रसंगी नामविहीन असे पडलेले आहे. हे सारे साहित्यभांडार नृत्यरूप करून रंगमंचावर आणण्यासाठी प्रयत्न अखंड चालू राहिले पाहिजेत. भाषेमुळे किंचित् दुर्गम वाटणारी ही भरतनाट्यम् कला सर्वसुलभ होण्यास त्यामुळे मोठा हातभार लागणार आहे. आमची ही पूर्वापार चालत आलेली नृत्यकला आता या साहित्याच्या नव्या उजाळ्याने लोकांसमोर आली पाहिजे.

असे अजोड मराठी साहित्य परंपरेत न सापडण्याचे एकच उघड कारण दिसते. ते म्हणजे राजे मराठी प्रजा तामीळ. त्यामुळे स्वाभाविकच मराठी राजानंतर त्याचे मराठी साहित्य मागे पडले परंतु दाक्षिणात्यांनी या कलेला आपल्या जीवनात मानाचे स्थान देऊन तिला जोपासले. तामीळ, तेलुगू व कानडी साहित्याने तिला समृद्ध केले व या त्यांनी जतन केलेल्या परंपरेमुळेच आज या 'भरतनाट्यम्'साठी लिहिलेल्या मराठी साहित्याला त्याच नृत्यात बांधणे आम्हाला शक्य झाले आहे; परंतु असे जरी असले तरीही हे मराठीतील अपूर्व साहित्य पाहिले की लक्षात येते की ही मराठी भाषेतील 'भरतनाट्यम्' नृत्यपरंपरा आजच्या 'भरतनाट्यम्' नृत्यपद्धतीहून अधिक सुसूत्र होती, कथारूप होती. त्यात अनेक नृत्यप्रकार अधिक होते. ते आज पाहण्यास दुर्मिळ झाले आहेत, त्याबाबत नीट माहितीदेखील उपलब्ध नाही. मराठी राजांच्या साहित्य भांडारावरून त्यांच्या कलाव्यासंगाची कल्पना येते. ते पाहण्यासाठी आपणास काही शतके मागे जावे लागेल, इतिहासाची काही पाने पाहावी लागतील, तेव्हाच आपणास ते नीट समजेल.

महाराष्ट्रातील शहाजीराजे भोसले, यांच्या दुसऱ्या पत्नी तुकाबाईसाहेब यांचे चिरंजीव व्यंकोजीराजे हे छत्रपती शिवाजी महाराजांचे सावत्रभाऊ.

त्यांनी सेंगमळ दास नामक 'नायक' राजास पदच्युत करून तंजावरची गादी काबीज केली. त्यानंतर शिवाजी महाराजांच्या वंशातील तंजावरच्या मराठी राजांनी एकंदर १८० वर्षे उत्तम प्रकारे राजसत्ता चालवली. त्यांनी तेथील परंपरागत संस्कारात कुठल्याही प्रकारची ढवळाढवळ अथवा नासधूस न करता त्यांची जोपासना केली व त्यांत अनेकप्रकारे मोलाची भर घातली. हे त्यांच्या कृतीवरूनच सिद्ध होते. तंजावरच्या सरस्वती-महाल वाचनालयात तामीळ, तेलुगू संस्कृत इत्यादी भाषांच्या मानाने मराठी भाषेतील ग्रंथ अल्पांश आहेत, तरीही आज उपलब्ध असलेल्या ग्रंथांचे क्रमांक २६७७ असून अनेक बाडे अशीच नंबराविना पडत राहिली आहेत. या मराठा राजांच्या परंपरेत दोन व्यंकोजी, दोन सरफोजी व दोन तुळजाराजे होऊन गेले आहेत व त्याजपैकी प्रत्येकाने अनेक विषयांवर अनेकविध लेखन केले आहे. त्यांच्यापैकी कोणी कोणता ग्रंथ लिहून ठेवला असावा, हे अगदी तंतोतंतपणे शोधून काढणे हे इतिहासकारांचे काम आहे. येथे आपल्याला मराठी राजांनी साहित्य क्षेत्रात विशेषत: संगीत नृत्याबाबत काय कामगिरी बजावली, तेवढेच पाहावयाचे आहे.

एंकोजी अथवा व्यंकोजी अथवा येकोजीनंतर गादीवर आलेले त्यांचे चिरंजीव श्री. शहाजीराजे हे होत. इ.सन १६८४ पासून इ.सन १७११ पर्यंत त्यांनी राजसिंहासन सर्वार्थानी भूषविले. श्रीधर व्यंकटेश, त्र्यंबकराय मखी इत्यादी अनेक विद्वान लेखक त्यांच्या दरबारी होते. या काळात शतकावधी वाङ्मयीन रचना केल्या गेल्या. त्यातील बरेचसे साहित्य स्वत: शहाजीराजे(दुसरे) यांनी लिहिले आहे. 'तिरुवारूर' त्यागराजांचे 'त्यागेश, त्यागराज, त्यागनुत, त्यागनटेश' इत्यादी नावांनी त्यांचा उल्लेख सापडतो. आपल्या प्रजेचे ते अत्यंत आवडते होते म्हणूनच प्रजेने त्यांना 'अभिनवभोज' हे टोपणनाव बहाल केले होते. पुराण, काव्य, आचारशास्त्र, वैद्यक, ज्योतिष, संगीत, नाट्यनृत्य इत्यादी अनेक विषयांवर त्यांनी मराठी, तेलुगू व संस्कृतमधून ग्रंथरचना केली आहे. त्यांची तेलुगू पुस्तके आजही दक्षिण भारतात प्रसिद्ध आहेत. त्यांनी लिहिलेल्या १० मराठी नाटकांपैकी 'पंचभाषाविलास' हे नाटक पाच भाषांमधे लिहिलेले आहे. शहाजीराजांच्या भाषापांडित्याबद्दल एवढे पुरेसे आहे. त्यांनी लिहिलेल्या असंख्य पदांना कोणता 'राग' व 'ताल' असावा, हेदेखील प्रत्येक पदाच्या पूर्वी त्यांनी नमूद करून ठेवले आहे.

अलंकारशास्त्राचा त्यांचा किती सखोल व्यासंग होता, हे त्याच्या पदावरून कळून येते. त्यांच्या पदातून आढळणारे, निरनिराळे नायिकाभेद- अवस्थानुसार, 'वासकसज्जादी', वयानुसार 'मुग्धादी', 'धर्मानुसार', 'स्वीयादी' हे इतके उत्तम लक्षणयुक्त आहेत की त्याला तोड नाही, असे वाटते. आजच्या भरतनाट्य परंपरेत तेलुगू भाषेतील 'मूव्वगोपाल' लिखित नायिकाभेदांनी युक्त अशी विपूल पदे रंगमंचावर सादर केली जातात, तरीही शहाजीराजांची पदे आपले आगळेच वैशिष्ट्ये राखून आहेत.

त्यांच्यानंतर राजपदावर आलेले त्याचे दुसरे बंधू महाराज सरफोजी (पहिले) यांनी इ.सन १७११ ते १७२८ पर्यंत राज्य केले. यांनी संस्कृतमध्ये 'राघवचरितम्' लिहिले आहे. शिवाय देवांच्या स्तुतीपर अनेक प्रकारची पदे रचली आहेत.

त्यांच्या मागोमाग गादीवर आलेले त्यांचे धाकटे बंधू राजे तुळजा (पहिले) हे तुकोजी व अमरेंद्र या नावांनी साहित्यामध्ये आढळतात. तुळजाराजे (इ.सन १७२९ ते १७३५) हे संस्कृताचे गाढे पंडित होते. संगीतशास्त्रावरील 'संगीतसारामृत' हे त्यांचे पुस्तक प्रमाण मानले जाते. नाट्य नृत्यावरील, 'नाट्यवेदांगम्,' जोतिषशास्त्रावर 'एनाकुळतेजोनिधी' आणि मराठीतील 'बहुल कथा' चूर्णिका ही त्यांची अत्युत्तम पुस्तके होत. 'धन्वंतरी विलास' व 'धन्वंतरी सारनिधी' नावाचे संस्कृत ग्रंथ त्यांनी वैद्यकशास्त्रावर लिहिलेले आहेत. या शास्त्रीय ग्रंथावरून महाराजांचा व्यासंग सहज कळून येतो.

त्याचे पुत्र एकोजी(दुसरे) यांनी इ.सन १७३५ ते १७३६ फक्त एक वर्षच राज्य केले; परंतु वाङ्मयीन कामगिरी बरीच केली. त्यांनी संस्कृतमध्ये प्रपंचामृत सारसंग्रह नावाचा शब्दकोशासारखा ग्रंथ लिहिला आहे. तेलुगू नाटक 'विघ्नेश्वर कल्याणम्' लिहिले आहे. त्यांनी लिहिलेल्या मराठी ग्रंथांपैकी 'पतिव्रतोपाख्यान' व 'राजनिधी' हे दोनच ग्रंथ आज उपलब्ध आहेत.

यानंतर प्रामुख्याने उल्लेख करण्यासारखे राजे प्रतापसिंह होत.(इ.सन १७३९ ते १७६४) ते शूर योद्धे तर होतेच, पण भाषापंडितही होते. त्यांचे सारे आयुष्य इंग्रजांचे पारिपत्य करण्याकडे गेले. तरीही आपल्या विश्रांतीच्या वेळात त्यांनी निरनिराळ्या भाषांमध्ये अनेक नाटके लिहिली आहेत. आठ पुराणे एक रामायण, एक भागवत, एक काव्यग्रंथ, पंधरा नाटके, दोन कहाण्या, एक कामशास्त्र व काही पदे त्यांनी लिहिली आहेत. यातील बरेचसे मराठी

साहित्य तेलुगू लिपीमध्ये लिहिलेले आहे. मराठी राजांच्या पूर्वीचे तेलंगी नायक राजे यांनी या देशावर इ.स.१५५५ ते १६७५ पर्यंत राज्य केले असल्यामुळे या तामीळ देशाची राजभाषा तेलुगू होती. मराठी राजे तख्तावर आल्यानंतर देखील तेथील साहित्यिक भाषा बरीचशी तेलुगूच होती. त्याशिवाय तामीळ भाषेमध्ये मुळाक्षरे अपुरी असल्यामुळे मराठी किंवा संस्कृत त्या लिपीत लिहिणे अशक्यप्राय आहे. त्यामुळेच प्रतापसिंह महाराजांचे बरेच मराठी साहित्य तेलुगू लिपीमध्ये लिहिलेले आहे.

प्रतापसिंहानंतर त्यांचे पुत्र तुळजाराजे (दुसरे) गादीवर आले.(इ.सन १७६५-१७८७) त्यांनीदेखील उत्तम वाङ्मयीन कामगिरी केली, असे म्हटले जाते; परंतु त्याची नोंद अजूनपर्यंत सापडलेली नाही. असे असले तरी, त्यांच्या कारकिर्दीत संगीत कीर्तीच्या शिखरावर होते. अनेक दूरदूरचे संगीत कोविद त्यांनी आपले दरबारी विद्वान म्हणून गौरविले होते.

तुळजाराजानंतर गादीवर आलेले त्यांचे दत्तकपुत्र श्री. सरफोजी महाराज यांचे नाव तंजावरच्या मराठ्यांच्या इतिहासात सुवर्णाक्षरांनी लिहिले गेले आहे. कला, समाज व संस्कृती यातील असे एकही क्षेत्र नव्हते की ज्यात सरफोजींनी उल्लेखनीय कामगिरी केलेली नाही. आपल्या चौपन्न वर्षांच्या अल्पायुषात राजे सरफोजी अगदी खरेखुरे कलाकोहिनूर म्हणून शोभले. त्यांचा संपूर्ण इतिहास येथे नमूद करणे अत्यावश्यक आहे.

तंजावरमधील श्री ब्रहदिश्वर मंदिरात स्वत: सरफोजींनी कोरवून घेतलेल्या शिलालेखात भोसले वंशाची खालील माहिती मिळते. भोसले वंशाचे आदिपुरुष श्रीशंभूराजापासून तेरावे बाबाजीराजे होत. यांच्यापासून दोन परंपरा सुरू झाल्या, त्या येणेप्रमाणे:






श्री. शंरभजी(सरफोजी) राजे भोसले हे तुळजा महाराजांचे दत्तकपुत्र. श्री. तुळजाराजे भोसले(दुसरे)(इ.सन १७६५-१७८७) यांना स्वत:ची पुत्रसंतती नव्हती, म्हणून त्यांनी आपल्या भोसले कुळातील विठोजीचा वंशातील क्रमाने आठवा सरफोजी यांस दत्तक घेतले. त्यांचा स्वत:चा पुत्र असता, तर तो देखील मालोजीराजांपासून क्रमाने आठवाच आला असता. हा दत्तकविधी शास्त्रोक्त पद्धतीने करून गावात हत्तीवरून नौबतीनिशी साखर वाटण्यात आली. त्यावेळी तंजावरमध्ये असलेल्या इंग्रज अधिकाऱ्यास आगाऊ कळविण्यात आले, की तुळजाराजानंतर त्यांच्या राज्यास, भाग्यास व वंशास सरफोजी हेच अधिपती आहेत तरी इंग्रजांनी त्यांचा सांभाळ करावा. त्यानंतर चार-पाच दिवसांतच वसंत पंचमीच्या दिवशी उत्तम मुहूर्त पाहून श्री. प्रतापरामस्वामींचे महालात सदर करून राजासन घालून श्री. सरफोजीस दिनांक २१-१-१७८७ रोजी राजासनावर बसविले व इतर दरबारी मानकऱ्यांकडून त्यांचा राजवत् सन्मान करवला. चेन्नपट्टणास (मद्रास) गव्हर्नमेंटकडे त्याचा संपूर्ण तपशील पाठवला. या वेळी काही कारस्थानी दरबारी मंडळींनी एकत्र जमून विचार केला की श्री. तुळजा महाराजांचा अंतकाळ जवळ आला आहे आणि सरफोजीला दत्तक घेऊन इंग्रजांच्या ताब्यात दिले. म्हणजे तंजावरवर त्यांचेच वर्चस्व चालणार, आपणास कोणी विचारणार नाहीत व आपला मानही राखणार नाहीत म्हणून श्री. प्रतापसिंह महाराजांचा अनौरस पुत्र अमरसिंग, जो वयाने प्रौढ असून राज्यसूत्रे सांभाळण्यास योग्य आहे, त्यास राज्य देऊन आपणच राज्याचा उपभोग घ्यावा. असे हे कारस्थान रचून त्यांनी अफवा उठविल्या की तुळजाराजे शेवटची नीरवानीरव

करीत आहेत व त्यांनी अमरसिंगाला बोलावले आहे. तसेच पूर्वीच्या तपशिलास अनुसरून महाराजांच्या शिक्क्यानिशी एक पत्र मद्रासला धाडले. तदनंतर अगदी थोड्याच दिवसांत शके १७०८ पराभव संवत्सरी तुळजाराजे परमगतीला पावल तेव्हा दरबारी लोकांनी लौकिकापुरते सरफोजीस सोबत ठेवून अमरसिंगाच्या हस्ते उत्तरक्रियादि सर्व विधी करवून घेतले आणि त्याचा तपशील मद्रासला 'शिराजबल केमल'(SIR ARCHIBALD CAMP BELL) यांस लेडी 'केमल'(CAMPBELL) यांच्यामार्फत पाठवला व आपण केलेली योजना कळवली. महाराजा तुळजाच्या आत्म्याला शांती मिळावी, म्हणून ३१-१-१७८७ रोजी तेथे जमलेल्या सर्व लोकांनी प्रार्थना केली. राजा सरफोजी सिंहासनावर येताच पोरके झाले. त्यांचे राजमुकुट आपत्ती परंपरायुक्त काटेरी मुकुट ठरला. लेडी कॅम्बेल या तुजावरला आल्यावर सरफोजी महाराजांचा दत्तक हक्क सिद्ध करण्याचा फार्स झाला व दरबाऱ्यांच्या आणि पंडितांच्या सांगण्यावरून अमरसिंग हाच राज्याचा हक्कदार आहे, असे ठरवले. शके १७०९ प्लवंग संवत्सरी, इ.सन १७८७ च्या एप्रिल महिन्यात अमरसिंग राजपदावर आला. याने दहा वर्षांच्या सरफोजीला राजवाड्यातच नजरकैद करून ठेवले आणि त्यास नाना तऱ्हेचा त्रास देण्यास सुरुवात केली. मिशनरी श्वार्टझ् यांना हे कळताच त्यांनी अमरसिंगाविरुद्ध ही सरफोजीची 'केस' ईस्ट इंडिया कंपनीच्या अधिकाऱ्यास कळविली. ब्रिटिश रेसिडेंट मि. राम हे तंजावरला आले. त्यांना रेव्हरंड फेड्रिक श्वार्टझ् यांच म्हणणे पटले. याच वेळी 'कोर्ट ऑफ डायरेक्टर' चा विलायतेहून निरोप आला की सरफोजीस अमरसिंगाच्या निर्बंधातून मुक्त करून त्याचे संरक्षण करावे. याप्रमाणे दिनांक २२-१०-१७८९ रोजी साधारण अडीच वर्षांनंतर श्री. सरफोजीराजेंची सुटका झाली. कंपनी सरकारच्या संरक्षणाखाली सरफोजीराजे दिवाणखाण्यात राहू लागले. पाद्री श्री. श्वार्टझ् यांनी तंजावरमधील पंडितांच्या मदतीने श्री. सरफोजीराजे यांच्या अडचणी समजावून घेऊन त्या कंपनीस कळवून त्यांच्या खर्चाची व्यवस्था करवली. याचवेळी श्री. सरफोजीराजांनी आपला वेळ फुकट जाऊ नये म्हणून श्री. श्वार्टझ् यांच्याकडून इंग्रजी शिकण्यास सुरुवात केली. त्यामुळे राजांचा इंग्रजीचा अभ्यास चांगला झाला. याचवेळी ते विद्वान पंडितांकडून मराठी, तामीळ व अरबीदेखील शिकत असत.

या काळात अमरसिंगाचा उपद्रव वाढतच होता. शेवटी श्वार्टझ् यांनी राजे व राजमाता यांना चेन्नपट्टण येथे कंपनीच्या आश्रयास आणून ठेवले. रेव्हरंड गॅरिक यांजकडे श्री. सरफोजीराजेंच्या शिक्षणाची जबाबदारी सोपवली व आपण स्वत: तंजावरला परतले. इंग्रजांनी महाराजांना मोठ्या मानाने वागवले. काही काळ गेल्यानंतर श्री. सरफोजीराजें आपल्या दत्तक हक्कासंबंधी कंपनीकडे विचारणा केली. कंपनीने तंजावरमधील पंडितांकडे चौकशी करून त्यांची मते मागवली. अमरसिंगालाही त्यांचे मत विचारण्यात आले, तेव्हा त्याने आपला विरोध लिहून कळवला. ही सर्व मते कंपनीने काशी इत्यादी धर्मक्षेत्री पाठवली व तेथील पंडितांकडून दत्तक विधानासंबंधी धर्मपीठाची मते मागविली. आणि शेवटी सरफोजी महाराजास अमरसिंगाचा उपद्रव होणार नाही, अशी व्यवस्था करून तंजावरला पाठवले. पाद्री श्वार्टझ् यांनी हिंदूधर्म शास्त्रनिर्णयाचा आदर केला व अमरसिंगास गादीवर आणताना खोट्या साक्षी दिलेल्या बारा पंडितांपैकी जे जिवंत राहिले होते. त्यांच्याकडून केलेल्या चुकीचा व अन्यायाचा कबुलीजबाब वदवून घेतला व अमरसिंगाच्या कुटिल कारस्थानाचा संपूर्ण अहवाल इंग्रजांस कळवला. इंग्रजांना सरफोजीचा हक्क मान्य होता; परंतु त्याचवेळी श्री. श्वार्टझ् आजारी पडले व १३ फेब्रुवारी १७९८ रोजी ख्रिस्तीवासी झाले. सर्व धर्मांचे व जातीचे लोक त्यांच्या निधनाने फार हळहळले. त्यांच्या शवाचे अंत्यसंस्कार सेंट पीटर्स चर्चच्यासमोर विधिपूर्वक करण्यात आले. श्री. सरफोजीराजे फारच कष्टी झाले. त्यांचे पितृवत् छतच काळाने हिरावून घेतले होते. महाराजांचे निष्कपट वर्तन, कोमल स्वभाव व आदर्श वर्तणूक पाहून रेव्हरंड गॅरिकही त्यांच्यावर ममता करू लागले.

अमरसिंगाच्या ११ वर्षांच्या कारकिर्दीत सारी प्रजा हैराण झाली होती. सारा वसूल होत नव्हता. इंग्रजांना मिळत नव्हता. कोणतेच कार्य नीट होत नव्हते. सर्वत्र बेबंदशाही बोकाळली होती आणि म्हणून इंग्रजांनी शके १७२० काळयुक्तीनाम संवत्सरी, जून १७९८ मध्ये सरफोजींना सिंहासनावर बसवले आणि या घटनेचा साद्यंत तपशील प्रसिद्ध केला. त्यामुळे लोकांना इंग्रजांच्या न्यायी वागणुकीबद्दल आदर वाटू लागला.

श्री. श्वार्टझ् यांनी लहानपणीच प्रोत्साहनाचे खतपाणी घालून जोपासलेले सरफोजींचे भाषाप्रेम व ग्रंथप्रेम अखंडपणे वाढतच गेले. ते खऱ्याखुऱ्या अर्थाने

भाषापंडित होते. आपल्या मातृभाषेशिवाय तामीळ, तेलुगू, संस्कृत, इंग्लिश, जर्मन, लॅटिन, ग्रीक, अरेबिक इत्यादी भाषा त्यांना उत्तम अवगत होत्या. उत्तम साहित्याचे ते परम भोक्ते होते. त्यामुळे लवकरच त्यांच्याकडे उत्तमोत्तम दुर्मिळ ग्रंथाचा संग्रह जमला. निरनिराळ्या ठिकाणी दौऱ्यावर किंवा यात्रेसाठी गेले असताना मिळतील ती पुस्तके ते खरेदी करीत व जी दुर्मिळ होती त्यांच्या नकला करून घेत. मधुमक्षिकेप्रमाणे जमवलेल्या आणि स्वत: व स्वत:च्या पूर्वजांनी लिहिलेल्या या अमूल्य ग्रंथाचा साठा व एक लाख रुपये त्यांनी शेवटी विश्वस्तांच्या हाती सोपविले, या संग्रहालयालाच पुढे देण्यात आलेले, 'तजावर महाराजा सरफोर्जीचे सरस्वती महाल वाचनालय' हे रूप म्हणजे राजा सरफोजीवरील जनताप्रेमाचे प्रतीक होय.

श्री. सरफोजीराजे गादीवर येताच त्यांनी प्रथम आपल्या दप्तरी हिशेबाची एक पद्धत सुरू करून संपूर्ण राज्यात सुव्यवस्था निर्माण केली आणि प्रजेचा दुवा घेतला. आपल्या दर्जाच्या कुळांतील घाटग्याच्या दोन्ही मुली यमुनाबाईसाहेब व अहिल्याबाईसाहेब या दोघींशी त्यांनी लग्न केले. यापूर्वी त्यांनी एका सर्वगुणसंपन्न स्त्रीचा अंगीकार केला होता. तिचे संतान तर जगलेच नाहीच; परंतु दुसऱ्या वेळी ती स्त्रीदेखील मरण पावली. तिच्या अंतिम इच्छेनुसार महाराजांनी सेतुरामेश्वर मार्गावर मुक्तांबापूर नावाचे छत्र बांधून आपल्या प्रेयसीच्या प्रेमाचे प्रतीक निर्माण केले. तंजावरमधील पाण्याची अडचण लक्षात घेऊन शिवगंगै तलावातून, पाताळ सुरंगामधून पिण्याचे पाणी जलसूत्राद्वारे थोरामोठ्यांच्या घरी आणवले. श्री. मानकोजीराव गाडे यांच्या देखरेखीखाली तंजावरमध्ये उघड्या गटाराची मोठ्या प्रमाणात योजना आखली. 'पेरिय कोविल' म्हणजे मोठे देऊळ या ठिकाणी देवळाच्या प्रांगणाच्या भिंतीवर मराठी रियासत कोरून दगडांना बोलावयास लावले. राजांची कल्पकता व दूरदर्शीपणा यांतून दिसतो. देवळाच्या प्रकारातील शिलावर खोदलेले हे 'भोसले वंश चरित्र' ग्रंथरूपात आजही प्रसिद्ध आहे. १३ डिसेंबर १८०३ रोजी हा लेख लिहून पूर्ण झाला, हे त्यात नमूद केलेले आहे.

आपल्या प्रजेच्या शिक्षणाकडेदेखील त्यांचे लक्ष होते. त्यांनी अनेक शाळा सुरू केल्या. या शाळांतून देशी भाषांबरोबर पाश्चिमात्य भाषांचेही शिक्षण दिले जात असे. मोफत शिक्षणाचीदेखील सोय होती. मोडी संदर्भावरून असे लक्षात येते की केवळ भाषांच्याच नव्हेत तर 'नवविद्या शाळा',

'वेदांतशास्त्र शाळा', 'नाट्याशास्त्र शाळा', 'ज्योतिषशास्त्र शाळा' नावाच्या विशिष्ट विषयांचे अभ्यासक्रम असलेल्या शाळाही अस्तित्वात होत्या. त्यांनी अनेक परंपरागत व आदर्श शिक्षकांना एकत्र आणून मुलांसाठी भूगोल, इतिहास इ. विषयांच्या पाठ्यग्रंथाचे तामीळ व मराठीत भाषांतर केले. लोकांना भूगोलाचे ज्ञान हसत खेळत मिळावे म्हणून स्वत: 'देवेंद्र कोरवंजी' नावाचे भौगोलिक नाटक लिहिले. त्यांनी तंजावरमध्ये अनेक इस्पितळे सुरू केली. या इस्पितळांतून निष्णांत इंग्रज व ऐतद्देशीय वैद्यांच्या देखरेखीखाली रोग्यांना वैद्यकीय मदत मोफत मिळत असे.

प्रजेची अशी सेवा करीत असतानाच फावल्या वेळात नृत्यसंगीतादि कलांचीदेखील श्री. सरफोजीराजेंनी मन:पूर्वक सेवा केली. पाश्चात्य वाद्यांनी सुसज्ज आणि वाद्यवृंदासाठी योग्य अशा अनेक तामीळ, तेलुगू व मराठी रचना केल्या. हिंदुस्थानी चाली आणि राग वाद्यवृंदासाठी इंग्लिश नोटेशन्समध्ये बसवून ती नोटेशन्स अनेक ग्रंथातून नोंदवून ठेवली. पाश्चिमात्य वाद्यसंगीत भारतीय वादकांना शिकवण्याच्या कल्पनेतूनच श्री. सरफोजीराजेंनी सुप्रसिद्ध 'तांजोर बँड' ची स्थापना केली. त्यांच्याच एका सरदारांचा मुलगा 'वरहप्पैया' हा त्यांच्याकडे बँड मास्टर म्हणून होता. राजा व त्यांच्या वादकांनी वापरलेले इंग्लिश व्होकल म्युझिक व वाद्यसंगीत यावरील सुमारे दीडशे ग्रंथ 'सरस्वती महाल' ग्रंथालयात आहेत. सरफोजींच्या मनात त्रावणकोरच्या श्री स्वाती तिरुनाळ महाराजांबद्दल अत्यंत आदर होता. ते देखील श्री. सरफोजीराजेंप्रमाणे भाषापंडित व संगीताचे भोक्ते असल्यामुळे दोघांचे खूप सख्य होते. ते एकमेकांच्या विद्वानांची, संगीततज्ज्ञांची आणि स्वत:च्या रचनांचीदेखील अदलाबदल करीत असत, इतका त्यांना एकमेकांविषयी विश्वास होता.

महाराजा सरफोजींची पाश्चिमात्य संस्कृतीविषयी आवड त्यांना मूळ धर्मश्रद्धा आणि पवित्र सनातनी आचारांपासून कधीही च्युत करू शकली नाही. त्यांची धर्मश्रद्धा त्यांनी केलेल्या अनेक पवित्र कृत्यांवरून सिद्ध होते. चोळदेश यात्रा, श्रीरंग यात्रा, गंगा यात्रा, पळणी यात्रा इत्यादी यात्रांवरून आणि देवस्थानास हिरे, माणके आणि इतर उपयुक्त वस्तूंच्या दिलेल्या भेटीवरून त्यांची स्वधर्माविषयीची श्रद्धा व्यक्त होते. 'त्रिस्थळी यात्रेच्या लावण्या' नामक आपल्या ग्रंथात त्यांनी हे सारे सूत्रबद्ध करून ठेवले आहे. श्री. ब्रहदिश्वर मंदिराची डागडुजी करून तेथे कुंभाभिषेक मोठ्या थाटात पार

पाडल्याची नोंद देवालयातील शिलालेखात कोरलेली आजही उपलब्ध आहे.

राजा श्री. सरफोजींनी लिहिलेल्या ग्रंथात नृत्य प्रकारांचा फार मोठा संग्रह आहे. त्यांनी सहा पुराणे, दहा नाटके, कोर्व्याचे साहित्याचे जिनस, नाट्यप्रबंध, विविध कर्नाटक रागरागिण्या व शेकडो पदे रचलेली आहेत. या साऱ्यांना त्यांनी स्वत: स्वर व तालबद्ध करून ठेवले आहे. आजच्या परंपरागत भरतनाट्यम्‌मध्ये अस्तित्वात असलेले प्रकार तर त्यात आहेतच, शिवाय गीत, प्रबंध, त्रिपुट, जक्किणि, मातृका, दरू इत्यादी दुर्मिळ नृत्यप्रकारही त्यात अनेक आहेत. कोणतीही नवी पद्धत ही जुन्या पद्धतीवरच आधारलेली असते. मराठा राजांच्या पूर्वी तंजावरवर शताधित वर्षे राज्य केलेले चोल व नायक हे तेलंगी राजेदेखील कलांचे आश्रयदाते होते. त्यांच्याकाळीदेखील ही नृत्यपद्धती कोणत्या ना कोणत्या तरी स्वरूपात अस्तित्वात असणारच. त्यांच्यानंतर मराठी राजांनी रचलेली अनेक सुंदर पदे व निरनिराळे प्रकार आजही पाहावयास सापडतात; परंतु राजा श्री. सरफोजीराजेंच्या प्रकारातील सुसूत्रता त्यांच्या पूर्वीच्या कोणाच्याच लिखाणात सापडत नाही. जयजय, शरणू, अलारु ह्या प्रकारापासून मंगळेपर्यंत सतरा ते अठरा प्रकार एकच राग व तालात निबद्ध करून व त्यातून एकच कथासूत्र गुंफून त्यांनी तयार केलेल्या उत्तमोत्तम निरुपणातून त्यांचे उपजत कल्पनाचातुर्य नुसते ओसांडून राहिले आहे. हे प्रकार त्यांनी नुसते रचलेच नाहीत, तर ते नाचणाऱ्या नर्तिका व नट्टुवनार तयार करून त्यांचे प्रयोगही 'संगीत महाल' किंवा 'नट्टुवनार चावडी' या ठिकाणी सादर करण्यात आले होते. या ठिकाणी नमूद करण्यासारखी एक गोष्ट म्हणजे श्री. सरफोजीराजेंच्या दरबारी नर्तकी व नट्टुवनार यांच्यासाठी असलेल्या नियमांची एक यादी माझ्या पाहण्यात आली. कलावंतांनी कोणते कपडे घालावेत किंवा घालू नयेत, राजासमोर कसे वागावे इत्यादीविषयी अनेक नियम या यादीत समाविष्ट आहेत. याशिवाय या यादीमध्ये सुंदरी नामक एका नर्तकीचा उल्लेख सापडतो. ही नर्तकी बहुधा राजाच्या मर्जीतील असावी. कारण इतरांसाठी असलेले नियम तिला व तिच्या परंपरेला माफ असल्याची नोंद त्यात आहे. शिलंगणाच्या दिवशी(दसऱ्याला) नृत्याबद्दल तिला राजखजिन्यातून 'कुंपणी रुपये १५' दिले गेल्याचे नमूद केले आहे. यावरून हेच सिद्ध होते की श्री. सरफोजींच्या काळी ही किंवा अशा प्रकारची (आजच्या भरतनाट्यम्‌सारखी) नृत्यपद्धती रंगमंचावर अस्तित्वात होती; परंतु

आज या ग्रंथाव्यतिरिक्त कोणतीही मराठी शास्त्रीय नृत्यपरंपरा तंजावरमध्ये किंवा महाराष्ट्रात अस्तित्वात नाही.

आजच्या भरतनाट्यम्च्या दाक्षिणात्य परंपरेचे जनक सुप्रसिद्ध दाक्षिणात्य श्री. चिन्नैया, श्री. पोन्नैया, श्री. शिवानंद व श्री. वडिवेलु हे चार बंधू होत. हे राजा श्री. सरफोजीराजेंच्या दरबारी काही वर्षे होत. याविषयी काही मतभेद आढळतात म्हणून एतद्विषयक माझी मते प्रस्तुत नमूद करतो.

तुळजा महाराजांनी सरफोजींना इ. स. १७८७ मध्ये विधिपूर्वक दत्तक घेतले. तेव्हा श्री. सरफोजींचे वय दहा वर्षांचे होते.( हा सारा इतिहास यापूर्वी येऊन गेलेलाच आहे.) यानंतर बंडखोर अमरसिंगाने अकरा वर्षे राज्य केले. म्हणजेच राजा श्री. सरफोजी जेव्हा पाद्री श्वार्टझ्च्या मदतीने इ.स.१७९८ किंवा १८०३ साली पुनश्च सिंहासनस्थ झाले. त्यावेळी ते एकवीस वर्षांचे होते. इ.सन १८०२ साली म्हणजेच श्री. सरफोजी पंचवीस वर्षांचे असताना या आजच्या भरतनाट्यम्च्या आद्यप्रवर्तकापैकी पहिल्याचा जन्म झाला. क्रमाने चिन्नैया, पोन्नैया, शिवानंद व वडिवेलु यांचे जन्म इ.स.१८०२ किंवा १८०३ किंवा १८०४, १८०८ व १८१० याप्रमाणे आहेत. म्हणजेच शेवटचा बंधू जन्मला, तेव्हा महाराजांचे वय ३२ वर्षांचे होते. वरील चौघे बंधू श्री मुत्तुस्वामी दीक्षितार यांच्याकडे संगीत, तामीळ, तेलगु, संस्कृत इत्यादी शिकण्यास सात वर्षे राहिले होते. अर्थातच गुरुगृही विद्याभ्यास शिकण्यास जाणाऱ्या शेवटच्या बंधूचे-वडिवेलुचे-वय निदान आठ वर्षांचे तरी असावे, म्हणजेच हा वडिवेलु वयाच्या पंधराव्या वर्षी संपूर्ण कलाविद्यांमध्ये पारंगत झाला. त्यावेळी श्री. सरफोजींचे वय सत्तेचाळीस वर्षांचे होते.(इ.सन १८२५) पहिला बंधु चिन्नैया यावेळी बावीस वर्षांचा होता. आज तंजावरमध्ये राहात असलेले या परंपरेतील श्री.किटप्पा आपल्या 'पोनैया माणिमालै' या ग्रंथात लिहितात की या चारही बंधूंना श्री. तुळजा महाराजांनी आपणाकडे आणले व नंतर श्री.दीक्षितार याजकडे शिकण्यास पाठवले; परंतु तुळजा महाराज इ.सन १७८७ साली परलोकवासी झाले व या पिल्ले बंधूपैकी ज्येष्ठ बंधू इ.स. १८०२ किंवा १८०३ साली जन्मला. यावरून श्री. किटप्पा यांचे हे विधान इतिहाससिद्ध नव्हे, हे उघड आहे. त्याचप्रमाणे आपल्या हितकर्त्याला कोणी विसरू शकणार नाही; परंतु या बंधूनी लिहिलेल्या वर्णम्मध्ये एकही वर्णम् तुळजा महाराजांवर रचलेला आढळत नाही. श्री. पोन्नैया यांनी श्री.

सरफोजीराजांवर रचलेला फक्त एकच वर्णम् सापडतो. श्री. शिवाजी महाराजांवर (इ.स.१८३२ ते १८५५, तंजावरमधील शेवटचा मराठा राजा) श्री. शिवानंद याने पाच वर्णम् रचले आहेत. याचाच अर्थ हे चारही बंधू तुळजाकाळात नव्हते. श्री सरफोजींबरोबर अल्पकाळ व तदनंतर शिवाजी महाराजांच्या काळी होते, असेच म्हणणे युक्त ठरेल.

श्री. मुत्तुस्वामी दीक्षितार यांनी सादर केलेला पिल्ले बंधूचा 'अरेंगेट्रम्' (प्रथम रंगप्रवेश) इ.सन १८२५ मध्ये श्री. सरफोजी राजासमोर झाला असावा. त्यानंतर इ.सन १८३२ साली श्री. सरफोजीराजे परलोकवासी झाले. म्हणजे या विद्वानांचा सहवास महाराजांना फक्त सात वर्षे लाभला. कोणताही माणूस आपल्या यौवनाच्या काळी जे नूतन सर्जन करू शकतो ते वृद्धावस्थेत करू शकत नाही. श्री. सरफोजींना वयाची अंतिम सात वर्षेच फक्त या बंधूंचा सहवास घडला. असे असता महाराजांनी या पिल्ले बंधूंकडे प्रेरणा घेऊन आपले नृत्यप्रकार रचले, असे म्हणणे मोठ्याच धारिष्ट्याचे व अविचाराचे ठरेल.

आपल्या सामाजिक, सांस्कृतिक, कलात्मक व वाङ्मयीन कर्तृत्वाची दीप्तिमान कारकीर्द मागे ठेवून श्री. सरफोजी महाराज गेले. ते अमर झाले. तंजावरच्या कलावंत मराठा राजांची कारकीर्द संपुष्टात आली, असे मानावयास हरकत नाही. श्री. सरफोजीनंतर गादीवर आलेले त्यांचे पुत्र शिवाजी महाराज यांना इंग्रजांच्या वाढत्या त्रासामुळे अस्थिर परिस्थितीतच राज्य करावे लागले. इ.सन १८६६ साली तंजावर पूर्णपणे इंग्रजांच्या हाती गेले आणि या इतिहासाला पूर्णविराम प्राप्त झाला. अनेक राजे आले व गेले, साम्राज्ये आली व गेली; परंतु तंजावरची ती भव्ये मंदिरे, प्रकार नी वास्तू आणि श्री. सरफोजींचे सरस्वती महाल वाचनालय आजही मराठ्यांचा वाङ्मयीन इतिहास मोठ्या दिमाखाने मिरवीत आहेत.

(तंजावर नृत्य प्रबंध मधून साभार)



या जलदुर्गावरील दुसरे अचाट धाडस छत्रपती संभाजीराजांचे! ही धडक शहजादा अकबरासह २० हजार सैन्यानिशी याच जंजिऱ्यावर हल्ला करून(सतत तोफांचा मारा १५ दिवस) मारली. किल्ल्याभोवतीच्या ८०० यार्ड × ३० यार्ड (२४०० फूट लांब ×२० फूट खोल) खंदकात दगड, लाकूड, कापसाची कानेदी, वृक्षादी टाकून भराव घातला. या कामासाठी पन्नास हजार माणसे कामाला लावली होती. फेब्रुवारी १६८२ च्या दरम्यान रस्ता तयार झाला होता. पण तेव्हांच औरंगजेबाने नवाब अलीखान यास कोकणाकडे पाठवले. नवाबाने कल्याण घेतल्याचे संभाजीराजांना समजले. स्वत:चा प्रदेश प्रथम राखलाच पाहिजे. या इराद्याने हातातोंडाशी आलेली जंजिरा मोहीम राजांनी सोडली. सिद्दीचे नशीब पुनश्च बलवत्तर ठरले. जंजिरा वाचला. छत्रपती संभाजी राजांच्या तावडीतून सुटलेल्या या जंजिऱ्याच्या मध्यावर चिरेबंदी मजबूत असा सुरुलखानाचा वाडा आहे. या तिमजली वाड्याभोवती आता वृक्षवेलींनी ठाण मांडायला सुरुवात केली आहे. कालाय तस्मै नम: । सुंभ जळाला तरी पीळ कायमच असलेल्या या उत्तम तटबंदीला २२ बरूज असून ते आजही मजबूत आहेत. वर अनेक तोफांची तोंड सागराकडे न्याहाळत काय संदेश देतात हे तेथे थबकल्यानेच कळेल.



संस्थान जंजिरा (पूर्वीच्या कुलाबा (सध्या रायगड) वा अलिबागकडील तालुका) १९४८ ला तत्कालीन मुंबई प्रांतात सामील झाले. मुरुडला नवाबाची शानदार हवेली आहे. त्यांचे वंशज इंदौरात (म. प्रदेश) वास्तव्यास असल्याचे कळते.



**प्रा. डॉ. प्रभाकर ताकवले**

**जन्म :** १३/१०/१९३४(ललिता पंचमी)
मु. पो. हरगुडे , ता. पुरंदर, जि. पुणे.
**शिक्षण :** परिंचे, शिरवळ, पुणे येथे.
**महाविद्यालयीन शिक्षण:** फर्ग्युसन कॉलेज, लॉ कॉलेज, डेक्कन कॉलेज, पुणे विद्यापीठ. बरेच प्रशंसनीय सन्मान.
**अध्यापन व प्रशासन :** मालेगाव, सटाणा, श्री शाहू मंदिर पुणे, हिंदी विभाग पुणे विद्यापीठ. अनेक युरोपियन देश,अमेरिका,कॅनडा प्रवास व वास्तव्य.
**अनुवाद व लेखक:** व्होल्गा ते गंगा, सिंहवाहिनी भारतीय भाषा और मराठी भाषा, प्राचीन हिंदी कवी, संस्कृत कवी शिवशाहीतील अष्टप्रधान इ. अलीकडे समग्र बुधभूषण (अनुवाद), नायिकाभेद, नखशिख व सातसतक (संपादक व अनुवाद )
**इतर :** अनेक शैक्षणिक ग्रामीण संस्थांशी स्नेहबंध, नाणकशास्त्र, मराठी राज्य स्मृति प्रतिष्ठान व पुरंदर मित्र मंडळ इ. महाराष्ट्रेतिहास व साहित्य संस्थांशी भावानुबंध. पहिल्या सासवड येथील छत्रपती संभाजी महाराज साहित्य संमेलनाचे अध्यक्ष
**आगामी पुस्तके :** अकबराची नवरत्ने, प्रणवीर राणाप्रताप






प्रबोधनातून परिवर्तन..!!

धीरवीर व पुण्यश्लोक श्री शिवरायांचे सवाई वारसदार, तेजोदीप छत्रपती संभाजीराजे यांच्या प्रत्युत्पन्नर्मात 'बुधभूषण' या सार्थ स्वकुलवर्णनाच्या मार्मिक वंदनांच्या अन्योक्तिवृंदानंतर अनेक पूर्वसूरी दंडनीतिज्ञ पंडितांच्या संस्कृत कोषागारातील वचनांच्या मार्मिक मागोवा घेतलेल्या जवळपास सहस्त्र श्लोकांचे मराठी भाषांतर शिव--शंभू कृपेने आम्ही सर्वदूर पसरलेल्या मराठमोळ्या भाविकांसाठी सिद्ध केले. त्या कृपाप्रसादानंतर श्री शंभूराजांच्या शेष तीन हिंदी ग्रंथाकडे (नायिकाभेद, नखशिख व सातशतक) आम्ही वळलो. महाराष्ट्रातील धांडोळ्यात जेवढी पदे हाती लागली ती या हिंदी त्रयदलात अनुवादली आहेत. शेष पदासाठी श्री शंभूप्रेमींसह, मधुसंचय जारी आहे. तोपर्यंत ही त्रिदलातील पानफुले मनोभावे, दुसऱ्या पूजेसाठी ठेवून घ्या. त्यांचा प्रभाव सुगंध खचितच वाचकास आगळा-वेगळा अनुभव देईल. धागे से पता चलेगा ताग किस का है!

---

**छत्रपती संभाजी महाराज यांची राजमुद्रा**



**श्री शंभोः शिवजातस्य, मुद्रा द्यौरिव राजते।**
**यदंकसेविनो लेखा, वर्तते कस्य नोपरि।।**

- छत्रपती शिवाजीराजे यांचे पुत्र श्री. संभाजीराजे यांची मुद्रा आकाशाप्रमाणे शोभत आहे. तिचे अंकसेवन करणारांचा (आधार घेणारांचा) पगडा (प्रथम)कोणावर पडणार नाही? (सगळ्यांच्यावर पडेल.) **(षोडश मुद्रा)**